


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






वर्ष ३४,
अंक १३८.
ऑक्टोबर १९६१

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

संपादक
दि. के. बेडेकर

# नवीन सभासद

## ( ९ जुलै ते ६ ऑक्टोबर या कालावधींत झालेले )

तहहयात

१. श्री. रा. अ. काळेले, इंदोर.
२. श्री. कृ. शं. हिंगवे, पुणें २.
३. प्रा. पां. श्री. थोरे, पुणें २.
४. प्रा. भीमराव कुलकर्णी, पुणें २.

साधारण

१. प्रा. भानु चौधरी, फैजपूर ( जळगांव ).
२. श्री. लीलाधर चौधरी, खिरोदा ( जळगांव ).
३. श्री. भा. शं. इंगळे, खिरोदा ( जळगांव ).
४. श्री. सु. का. जोशी, जळगांव.
५. सौ. रोहिणी सु. जोशी, जळगांव.
६. श्री. अ. शा. जोशी, सांगली.
७. श्री. श्री. ग. सबनीस, सांगली.
८. श्री. इंदुताई वि. रानडे, सांगली.
९. प्रा. टी. पी. उपाध्ये, सांगली.
१०. श्री. पा. सा. गुंडवाडे, बेळगांव.
११. श्री. भा. भि. केरकर, दादर–मुंबई.
१२. श्री. कृष्णा चौधरी, वरुड ( अमरावती ).
१३. श्री. र. वे. आर्य, वलांडी ( धाराशिव ).
१४. श्री. श्री. सी. जोशी, मनमाड ( नाशिक ).
१५. श्री. ज. वा. कुलकर्णी, मनमाड ( नाशिक ).
१६. श्री. विमल दा. शुक्र, मनमाड ( नाशिक ).
१७. श्री. प्र. भा. सहस्रबुद्धे, मनमाड ( नाशिक ).
१८. श्री. गो. शं. अभ्यंकर, पुणें २.
१९. श्री. ब. ल. काठेवाडी, पुणें ४.
२०. प्रा. राजा चितळे, उस्मानाबाद.
२१. श्री. रा. चिं. ढेरे, पुणें २.
२२. श्री. पु. उ. शेठ, पुणें २.
२३. श्री. श्री. भा. भागवत, मुंबई ४.
२४. प्रा. प्रभाकरराव कुलकर्णी, गुलबर्गा.
२५. श्री. ना. व्यं. गोडबोले, नागपूर.
२६. श्री. वि. ग. शेळके, अहमदनगर.
२७. श्री. म. कृ. कुलकर्णी, पुणें ४.
२८. सौ. माधुरी प्र. पालकर, पुणें २.
२९. श्री. एम्. डी. चौधरी, जळगांव.
३०. प्रा. आ. था. जकाते, पंढरपूर.
३१. श्री. ना. ग. गांधी, पुणें २.
३२. श्री. सु. श्री. दामले, पुणें २.
३३. श्री. मोहन पवार, बेळगांव.
३४. श्री. गो. म. टाकळकर, पुणें २.
३५. श्री. ज. शं. कवठेकर, पुणें २.
३६. श्री. रा. म. दिवेकर, पुणें २.
३७. श्री. व. अ. सहस्रबुद्धे, पुणें २.
३८. श्री. प्रा. भाऊ मांडवकर, अमरावती.
३९. श्री. रा. वा. खिरे, पुणें २.
४०. सौ. शकुंतला ग. सहस्रबुद्धे, पुणें २.
४१. श्री. शि. सी. अभ्यंकर, पुणें २.
४२. श्री. ग. म. गुते, पुणें २.
४३. श्री. वि. रा. फडके, पुणें २.
४४. श्री. सरला दि. तांबोळी, जळगांव.
४५. सौ. आशा म. आठवले, जळगांव.
४६. श्री. कुसुम रं. वाडेकर, जळगांव.
४७. श्री. रा. कृ. प्रभुदेसाई, जळगांव.
४८. श्री. तारा शं. जोशी, जळगांव.
४९. श्री. नलिनी स. म्हाळस, जळगांव.
५०. प्रा. गं. ना. क्षीरसागर, अमळनेर.
५१. कु. माणिक य. गुते, अमळनेर.
५२. श्री. पद्मावती स. निजसुरे, अमळनेर.

( कव्हर पान ३ पाहा )

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : दि. के. बेडेकर

संपादक-मंडळ
वा. रा. ढवळे–रा. शं. वाळिंबे
त्रि. म. कुलकर्णी - कृ. व. निकुंब

वर्ष ३४, अंक १३८ जुलै–ऑगस्ट–सप्टेंबर १९६१

## संपादकीय

१. ग्वाल्हेर येथें भरणाऱ्या संमेलनाचें अध्यक्षस्थान सौ. कुसुमावती देशपांडे यांनी विभूषित केलें आहे. महाराष्ट्र राज्य स्थापन झालें व मराठी भाषा ही या राज्याची भाषा झाली. या भाषेचें साहित्य मराठी भाषकांच्या हृदयांना एकत्र आणणारी शक्ति असून साहित्य-संमेलन हें त्या शक्तीचें सगुण असें रूप आहे. या संमेलनाचीं सूत्रें कुसुमावतीबाईंच्या हातीं असावींत हा मोठा सुयोग आहे. त्यांचें अभिनंदन करतांना मनांत येतें की महाराष्ट्रांतील सर्व साहित्यिकांनी व साहित्य-संस्थांनी एकत्र येऊन भावी काळांत जी साहित्याची सेवा करावयाची आहे तिच्या-साठी लागणारी प्रेरणा देणारी व्यक्ति आम्हां साहित्यिकांना मार्गदर्शनासाठी लाभली आहे. अनिलांनी आपल्या कवितेंत गाइलेलें आत्म्याचें 'यौवन' आणि प्रसन्नता हृदयांत असणारी आणि चिंतनाच्या गांभीर्याने व मार्दवाने सर्वांना एकत्र आणणारी व्यक्ति संमेलनाला अध्यक्षपदीं लाभली, याबद्दल सर्वांना झालेला आनंद आम्ही येथें शब्दरूपाने पुरेसा व नीटसा व्यक्त करूं शकत नाही.

२. हें संमेलन साहित्य-संस्थांमध्ये ज्येष्ठपणाचा मान असलेल्या म. सा. परिषदेतर्फे भरत आहे. कदाचित् पुढचें, निदान त्यानंतरचें संमेलन महामंडळातर्फे भरणार आहे. मराठी भाषा, साहित्य, कला आणि संस्कृति यांच्या सर्वांगीण आणि सार्वत्रिक उदयासाठी लागणारें सामर्थ्य आज महाराष्ट्राच्या साहित्य-संस्थांतून आणि नागर व ग्रामीण लोकजीवनांत विखुरलेलें आहे. तें या जीवनाच्या बहुविध रंगांनीं व रंगांच्या छटांनी नटलेलें आहे. त्या सामर्थ्याला एकमुखाने आवाहन देण्याचें कार्य आता महामंडळाने आपल्या शिरावर घेतलें आहे. या संस्थेचें पोषण विभागीय संस्थांच्या विविध कार्यांतून होणार आहे आणि या विविधतेंतूनच महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनाची एकात्म मूर्ति साकार होणार आहे. महाराष्ट्रांतील जनता आणि तिच्या कौलाप्रमाणे चालणारें महाराष्ट्र राज्य यांच्या शक्तीशीं महामंडळ आणि त्याच्या घटकसंस्था यांची शक्ति अगदी एकरूप झालेली असणें हें भावी प्रगतीच्या दृष्टीने आवश्यक आहे व सुदैवाने आज तशा तऱ्हेचा समवाय झालेला असल्यामुळेच सर्वसंमत लेखनपद्धति ठरविण्याच्या प्रश्नावर सर्वमान्य निर्णय झाल्याचें दृश्य आपण पाहूं शकत आहोंत. यापुढेहि अशा रेंगाळत

अनुक्रमणिका

राहिलेल्या अनेक लहानमोठ्या प्रश्नांच्या सोडवणुकीसाठी व नव्या निर्मितीसाठी ह्या समवायाची दृढता वाढत जाईल अशी आशा आहे. शासनाने चालविलेलें शिक्षण-प्रसाराचें कार्य, आकाशवाणीकेंद्रांचें कार्य आणि साहित्य-संस्कृति-मंडळ, भाषा-सल्लागार-समिति व साहित्य-अकादमी या संस्थांचें कार्य यांच्याशीं महामंडळ आणि घटकसंस्था यांच्या विविध कार्यांचा समन्वय जास्त जास्त होत जाईल असा दृढ विश्वास येथे आम्ही व्यक्त करतों.

३. या अंकांतील एका लेखांत हिंदीचे आदरणीय कवि श्री. मैथिलीशरण गुप्त यांचा परिचय दिला आहे; आणि दुसऱ्या लेखांत त्या कवीची ओळख महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल श्री श्रीप्रकाशजी यांनीं करून दिली आहे. तसेंच आणखी एक लेख रवींद्रनाथ ठाकूर आणि महाराष्ट्र यांच्यांतील परस्पर-संबंधाबद्दलचा आहे. या लेखांचें स्वागत आणि स्वीकार करतांना आम्हीं जी दृष्टि ठेवली तिचें स्वरूप म. म. पोतदार यांनी आपल्या पुणें विद्यापीठाच्या दीक्षान्त भाषणामध्ये पुढील शब्दांत स्पष्ट केलें आहे. ते म्हणतात, भारतीय ऐक्यसाधनेसाठी आपले विचार व्यापक ठेवून असें मानावें लागेल की, "एकच भाषा आपल्याला लागणारे सर्व विचार पुरवूं शकणार नाही. अनेक भाषांच्या उतारपेठांत जाऊन विचारधनाचा संग्रह आपणांस करावा लागेल." सार्वभारतीय अशी हिंदी भाषा आणि ठाकुरांनी समृद्ध केलेली बंगाली भाषा ह्यांच्या विचारधनाशीं आदरयुक्त संबंध जोडण्याच्या दृष्टीने वरील लेखांचा समावेश केला आहे व श्री मैथिलीशरण गुप्त यांच्या सत्तराव्या वाढदिवसाच्या अभिनंदनांत मराठी भाषकांच्या वतीनें आम्ही सहभागी झालों आहोंत.

या ठिकाणीं, नागपूर येथे 'आंतरभारती' संस्थेसारखें कार्य करणाऱ्या तेथील 'साहित्यसभे'च्या चवथ्या वार्षिकोत्सवप्रसंगीं महाराष्ट्राचे राज्यपाल श्री श्रीप्रकाशजी यांनी सप्टेम्बर ७, १९६१ रोजीं काढलेले उद्गार मननीय आहेत. श्री श्रीप्रकाशजी म्हणाले, "पुष्कळ लोक हिंदीला 'राष्ट्रभाषा' म्हणतात, परंतु आपल्या देशांत एकूण चौदा राष्ट्रभाषा आहेत व त्या सर्व भाषांना सारखाच दर्जा आहे." हिंदीच्या 'साम्राज्यवादी' प्रवृत्तीचा बागुलबोवा न करतां वरील उद्गारांत प्रकट झालेली समत्वाची भावना हिंदी भाषकांच्या थोर पुढाऱ्यांच्या मनांत दृढ आहे हें आपण लक्षांत घ्यावें व या सार्वभारतीय भाषेचा व्यासंग महाराष्ट्रांत वाढवीत जावा हें युक्त होईल.

४. ऑक्टोबर २, १९६१ रोजीं मुंबईस मराठी साहित्य महामंडळाची बैठक झाली व सप्टेंबर २, १९६१ रोजीं झालेल्या बैठकींत सर्वसंमत झालेल्या शुद्धलेखन-नियमावलीबद्दलचें तज्ज्ञ-मंडळाचें मत विचारांत घेऊन एक सर्वसंमत नियमावलि महामंडळाने ठरविली. महामंडळाचे अध्यक्ष म. म. पोतदार यांचें या निर्णयासंबंधीचें निवेदन व नवी नियमावली या अंकांत दुसरीकडे छापली आहे.

या नियमावलीला साहित्य-अकादमीच्या मराठी सल्लागार मंडळाने आपल्या ता. २९ सप्टेंबर १९६१ च्या बैठकींत पाठिंबा दिलेला आहे. या नियमावलीचे तपशीलवार स्पष्टीकरण करणारी पुस्तिका महामंडळातर्फे लवकरच प्रसिद्ध होत आहे. या नियमावलीसंबंधी महामंडळाच्या सभासदांच्या अपेक्षा व स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे आहेत. या नियमावलीला राज्यसरकारकडून लवकरच मान्यता मिळेल अशी महामंडळाची अपेक्षा आहे; तसेंच मराठी विषयाचें अध्यापन करणाऱ्या सर्व विद्यापीठांकडूनहि या नियमावलीचा स्वीकार होईल अशी आशा आहे. शासन, विद्यापीठें आणि साहित्यसंस्था यांनी स्वीकारलेली अशी सर्वसंमत नियमावली साहजिकच स्थैर्य पावेल आणि थोड्या कालावधींत ती सर्व लेखनांत सर्वांच्या अंगवळणीं पडेल असा विश्वास महामंडळास वाटत आहे.

हे नियम पूर्णपणें उच्चारानुसारी नाहीत व ग्रांथिक भाषा लिहिण्यासाठीच ते उपयुक्त आहेत. किंबहुना बाराव्या नियमांत म्हटलें आहे की, नाटकांतील पात्रांच्या तोंडीं किंवा इतरत्र वक्त्यांच्या तोंडीं बोलण्यांतील उच्चारानुसार भाषा घालावी लागते तेव्हा ती तशी लिहावी, ' अन्य प्रसंगीं तसें लिहूं नये. ' हीच गोष्ट प्रादेशिक बोलींच्या लकबींबाबत लागू होते. सारांश, सामान्य निरक्षर वा साक्षर लोकांच्या बोलण्यांत जशी भाषा येते तशीच ग्रांथिक भाषा लिहावी असें धरून ही नियमावली केलेली नाही. तसेंच लेखन सुलभ करावें म्हणून नियम करण्याचें धोरणहि या प्रयत्नाच्या मुळाशीं नसून **सर्वसंमत,** म्हणजे सर्व ठिकाणच्या विद्वानांना संमत, असें **ग्रांथिक भाषेचें नियमबद्ध लेखन** सर्व महाराष्ट्रांत स्थिर व्हावें यासाठीं प्रयत्न करून, दीर्घ विचारानंतर आणि सर्वांचे आक्षेप व मतें लक्षांत घेऊन, महामंडळाने ही नियमावली सिद्ध केली आहे.

या नियमावलीमुळे ' जुनें शुद्धलेखन ', ' परिषदेचें शुद्धलेखन ' आणि ' विदर्भ साहित्य संघाचें शुद्धलेखन ' या तीनहि रूढ पद्धतींत थोडेफार फेरफार करून सर्वच विभागांतील लेखकांना नवे नियम स्वीकारावयाचे आहेत. एक गोष्ट खरी की, लेखनपद्धति ही माणसाच्या डोळ्यांना आणि बोटांना सवयीची होऊन अंगवळणीं पडलेली बाब असल्याने, नवी पद्धति सहज स्वीकारणें मनाने शक्य झालें तरी तें हातांतून उतरत नाही. तेव्हा या ना त्या रूढ पद्धतीने वर्षानुवर्षें लिहीत असणाऱ्यांना आपली पद्धति बदलणें कठीण वाटेलच. तेव्हा या बाबतींत जें स्थित्यंतर घडावयाचें तें मुख्यतः नव्याने लिहिण्याचा सराव करणाऱ्यांपासून व्हावयास हवें. नव्या नियमावलीला धरून झालेलीं क्रमिक पुस्तकें, प्रसिद्ध होणारीं वृत्तपत्रें आणि इतर मुद्रित साहित्य मोठ्या प्रमाणावर सर्वत्र उपलब्ध होत गेलें म्हणजे या नियमावलीला आपोआपच सार्वत्रिक मान्यता व स्थैर्य प्राप्त होईल. तेव्हा या सर्व प्रश्नांच्या बाबतींत या ना त्या रूढ पद्धतीच्या किंवा नव्या पद्धतीच्या पक्षपात्यांनी अभिनिवेशाने वाद न घालतां परस्परांविषयी समजूतदारपणाने पुढील मार्ग सुकर केला, तर अनेक वर्षें चिघळत राहिलेला लेखनपद्धतीचा प्रश्न सुटेल. महामंडळाचे सभासद हे विभागीय साहित्य संस्थांचे नियुक्त प्रतिनिधीच आहेत, तेव्हा महाराष्ट्राच्या सर्व विभागांतून महामंडळाच्या या निर्णयाचा स्वीकार होईल, अशी महामंडळाची खात्री आहे.

५. श्री. विश्वनाथ दिनकर नरवणे यांचा ' भारतीय व्यवहारकोष ' त्रिवेणी संगम या मुंबईच्या संस्थेने नुकताच प्रसिद्ध केला आहे. सन १९५४ च्या नोव्हेंबरपासून श्री. नरवणे यांनी या कोशाच्या उद्योगाला प्रारंभ केला आणि सतत सात वर्षें प्रयत्न करून हा कोष भारतीय जनतेच्या हातीं दिला. सर्व भारताची यात्रा त्यांनी केली व शब्दांची भिक्षा मागत एखाद्या साधकाप्रमाणे ही कठीण तपस्या त्यांनी पार पाडली. भारतांतील पंधरा भाषा आणि इंग्रजी अशा सोळा भाषांतील सामान्य शब्दावली, व्याकरण शब्दावली, संभाषणांतील वाक्यें, आहारादीसंबंधी वाक्यें आणि व्याकरणाचीं वाक्यें या कोशांत दिलेलीं आहेत. शब्दाचा आणि वाक्याचा प्रत्येक भाषेंतील पर्याय उच्चारणासहित दिलेला आहे, त्यामुळे तुलनात्मक दृष्टीने या सर्व भाषांतील साम्यभेद कळून येणें सहज शक्य झालें आहे. भारतीय भाषांच्या विविध लिपी शेवटीं परिशिष्टांत दिल्या आहेत. उच्चारण आणि व्युत्पत्ति यांच्या अभ्यासाला असा हा कोष उपयुक्त झाला आहे. एकंदर ४०,००० शब्दांचा हा तुलनात्मक कोष सिद्ध करण्याचें कार्य बडोद्याचे नरेश श्री. फत्तेसिंह गायकवाड यांच्या उदार आश्रयामुळे आणि अनेक भाषा-कोविदांच्या सहकार्यामुळे श्री. नरवणे यांना पार पाडतां आलें, तरी त्या महान् प्रयत्नामागे त्यांच्या संपादनाचें योजकत्व आणि दृढनिश्चय हा ठळकपणें दिसतो. भारतीय भाषांसाठी हा कोष एका मराठी-

भाषक संपादकानें तयार करावा हें त्याला तसेंच महाराष्ट्राला भूषणावह तर आहेच, शिवाय भारतीयत्वाशीं आपण कसे मनाने एकरूप आहोंत हें दर्शविणारें हें एक प्रसन्न चिन्ह आहे.

दुसरा एक भारतीय स्वरूपाचा कोश साहित्य-अकादमीनें यंदा प्रसिद्ध केला आहे. हा कोश इंग्रजींत असून त्याला 'Who's who of Indian writers' असें नांव देण्यांत आलें आहे. सन १९५५ मध्ये या कोशाचें काम सुरू झालें व भारतीय भाषांतील लेखकांकडून जन्मतारीख, शिक्षण इत्यादि वैयक्तिक माहिती व ग्रंथनिर्मितीविषयीची माहिती मागविण्यांत आली. या सर्व माहितीचें संकलन व संक्षेप करण्याचें काम संपादक श्री. श्री. रा. टिकेकर यांनी केलें. हा कोश भारतांत व इंग्रजी भाषा जाणणाऱ्या सर्व देशांत उपयुक्त संदर्भग्रंथ ठरेल. या उपक्रमाबद्दल अकादमीला धन्यवाद दिले पाहिजेत.

अशाच तऱ्हेच्या लेखकसूचीची गरज प्रत्येक भारतीय भाषेंत आहे. मराठी लेखकांपुरतें म. सा. परिषदेने हें कार्य हातीं घेतलें आहे. अकादमीकडून माहिती गोळा करण्यासाठी जो तक्ता लेखकांकडे पाठविण्यांत आला होता त्यापेक्षा जास्त माहिती अपेक्षित करणारा तक्ता परिषदेकडून मराठी लेखकांना पाठविला जात आहे. लेखकसूचि तयार करणें हा उद्देश या प्रयत्नामागे आहेच, शिवाय आपल्या लेखकांच्या जीवनांतील अनेक सांस्कृतिक अंगांची माहिती उपलब्ध करून घेण्याचाहि प्रयत्न केला आहे. उदाहरणार्थ, मराठीखेरीज इतर भाषांच्या ज्ञानासंबंधी माहिती विचारली असून, भाषांतराच्या कार्यासाठी आज कितीजणांचें सहकार्य मिळूं शकेल याची कल्पना प्रस्तुत नोंदींवरून होऊं शकेल. परिषद्, विदर्भ साहित्य संघ, मराठवाडा साहित्य परिषद् व मुंबई मराठी साहित्य संघ यांच्या सभासदांच्या याद्यांतून, तसेंच प्रमुख मासिकांच्या व प्रकाशकांच्या लेखकवर्गांतून मिळतील तेवढ्या लेखकांकडे आम्ही हा तक्ता धाडीत आहोंत. अनवधानानें कोणाकडे तो धाडणें राहून जाईल, म्हणून अशी विनंती की लेखकांनी हा तक्ता परिषदेच्या कार्यालयाकडून मागवून घ्यावा व या कार्यांत आम्हांला सहकार्य द्यावें. ज्यांचा किमान एक ग्रंथ प्रसिद्ध झाला असेल त्यांच्याकडे तर तक्ता धाडण्यांत येईल; परंतु ज्यांचें लेखन स्फुट स्वरूपाचें आहे अशा नव्या लेखकांनीहि तक्ता मागवून भरून पाठवावा, म्हणजे अशा लेखकांचीहि नोंद आम्हांला संगृहीत करतां येईल.

## श्री. विठ्ठलराव घाटे यांचें अभिनंदन

साहित्य-अकादमीच्या मध्यवर्ती मंडळावर महाराष्ट्रातर्फे श्री. विठ्ठलराव घाटे यांची निवड झाली आहे व याबद्दल झालेला आनंद व्यक्त करून आम्ही त्यांचें अभिनंदन करतों.

* * *

## 'राष्ट्रकवि मैथिलीशरण गुप्त अभिनंदन समिति'

या संस्थेने नुकताच एक अभिनंदन-ग्रंथ प्रकाशित केला आहे. त्यांतील आपल्या लेखाचें मराठी भाषांतर या अंकांत प्रसिद्ध करण्यास श्री श्रीप्रकाशजींनी संमति दिली व समितीच्या कार्यवाहांनीहि तशी संमति दिली याबद्दल आम्ही या दोघांचे ऋणी आहोंत. अभिनंदन-ग्रंथांतील इतर लेखांचा, विशेषतः श्री रामधारीसिंह 'दिनकर' यांच्या परिचय–लेखाचा उपयोगहि, या अंकांतील श्री. शेटे यांनी लिहिलेल्या मैथिलीशरणजीसंबंधीच्या लेखासाठी झाला आहे, हें आम्ही आभारपूर्वक नमूद करतों.

* * *

अनुक्रमणिका

गं. दे. खानोलकर

# रवीन्द्रनाथ आणि मराठी वाङ्मय*

रवीन्द्रनाथांचा महाराष्ट्राशीं संबंध त्यांच्या वयाच्या अठराव्या वर्षापासून आला आणि ' प्रकृतीर प्रतिशोध ' व ' राजा ओ राणी ' ह्यांसारख्या नाटकांची व ' पूर्णिमाय ' ह्यासारख्या कांही भावघन वैणिकांची ( लिरिक्स ) निर्मिति, त्यांनी महाराष्ट्रांत मधून मधून होणाऱ्या आपल्या वास्तव्यांत केलेली असली, ' जयतु शिवाजी ' 'प्रतिनिधि', 'विचारक', 'सती' ह्यांसारख्या महाराष्ट्राच्या इतिहासांतील कांही व्यक्तींवर व प्रसंगांवर त्यांनी कविताहि लिहिलेल्या असल्या, तरी त्यांच्या सारस्वताचा परिचय, त्यांना १९१३ सालीं नोबेल पारितोषिक मिळेपर्यंत महाराष्ट्राला नव्हता. इंडियन सिव्हिल सर्व्हिसमध्ये असलेले त्यांचे एक थोरले बंधु सत्येन्द्रनाथ ठाकूर ह्यांचें वास्तव्य नोकरीच्या निमित्ताने महाराष्ट्रांतील अनेक प्रमुख शहरीं कित्येक वर्षे असतां व त्यांच्याकडे कित्येक विद्यार्थ्यासंगी मराठी लोकांचें जाणेयेणें घडत असतां रवीन्द्रनाथांशीं किंवा त्यांच्या सारस्वताशीं परिचय घडून येण्याचा योग त्यांना कधी आला नाही. येथे एक नवलाची गोष्ट सांगतों. रवीन्द्रनाथांचे हे बंधु साताऱ्यास मार्च १८९४ – एप्रिल १८९६ ह्या काळांत डिस्ट्रिक्ट जज्ज असतां, त्या वेळेस अगदीच तरुण असलेले व वकिलीच्या व्यवसायास ज्यांनी नुकतीच सुरुवात केली होती असे, केसरी-मराठा ह्या पत्रांचे भूतपूर्व संपादक, लोकमान्य टिळकांचे एक थोर निष्ठावंत सहकारी व मराठीचे साहित्यसम्राट् म्हणून गौरविले जाणारे नरसिंह चिंतामण केळकर त्यांजकडे जात-येत असत. त्यांना बंगाली शिकण्याची एकदा इच्छा झाल्या-मुळे, सत्येन्द्रनाथांनी आपली पत्नी ज्ञानदानंदिनीदेवी ह्यांची त्यांना शिकविण्याच्या कामीं योजना केली. त्याच सुमाराला रवीन्द्रनाथांचे दुसरे एक थोरले बंधु ज्योतिरिन्द्रनाथ साताऱ्यास आले होते. तेहि केळकरांना मधून मधून बंगाली भाषेचे धडे देत. ज्योतिरिन्द्रनाथांनी, बंगाली भाषेंत, स्वतंत्र व रूपांतरित अशीं ३३ नाटकें लिहिलीं आहेत. ज्योतिरिन्द्रनाथांशीं केळकरांचा परिचय घडून आल्यामुळे साहजिकच त्यांच्या नाटकांशींहि त्यांचा परिचय घडला. केळकरांनी ज्योतिरिन्द्रनाथांच्या मदतीने त्यांचें ' सरोजिनी ' हें बंगाली नाटक मराठींत अनुवादित केलें व १८९७ सालीं तें पुस्तकरूपाने प्रसिद्ध केलें. ठाकूर कुटुंबांतील लेखकाचें मराठींत प्रसिद्ध झालेलें ' सरोजिनी ' नाटक हें जसें पहिलें पुस्तक, तसेंच केळकरांनीहि लिहिलेलें व प्रसिद्ध केलेलें हें पहिलेंच पुस्तक. केळकरांच्या ग्रंथलेखनाला सुरुवात ह्या नाटकाने झाली. केळकरांचा ज्योतिरिन्द्र-नाथांशीं× परिचय होण्याचा योग त्या वेळेस आला, पण रवीन्द्रनाथांशीं किंवा त्यांच्या सारस्वताशीं परिचय होण्याचा योग मात्र जुळून आला नाही. त्यासाठी १९१४ साल उगवावें लागलें.

---

* शान्तिनिकेतन येथे विश्वभारतीच्या विद्यमाने दि. ८ ऑगस्ट ते १४ ऑगस्ट १९६१, ह्या सप्ताहांत भरलेल्या ' रवीन्द्रनाथ अॅण्ड इंडियन लिटरेचर्स कॉन्फरन्स ' मध्ये लेखकाने इंग्रजींत वाचलेल्या निबंधाचा अनुवाद.

× ज्योतिरिन्द्रनाथांनी पुढे कांही वर्षांनी लो. टिळक ह्यांच्या ' गीतारहस्य ' ग्रंथाचें बंगालींत भाषान्तर केलें.

ज्योतिरिन्द्रनाथ ठाकुरांचें सरोजिनी नाटक मराठींत प्रसिद्ध झाल्यावर रवीन्द्रनाथ ह्यांची एक वडील बहीण स्वर्णकुमारीदेवी हिच्या 'दीपनिर्वाण' व 'फुलेरमाला' अशा दोन कादंबऱ्यांचेहि अनुवाद मराठींत प्रसिद्ध झाले हेंहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ठाकूर कुटुंबांतील, ह्या दोन साहित्यिकांच्या सारस्वताकडे महाराष्ट्राचें लक्ष गेलें असतां रवीन्द्रनाथासारख्या त्या कुटुंबांतील श्रेष्ठ प्रतिभावंताच्या सारस्वताकडे महाराष्ट्राचें लक्ष कसें गेलें नाही, ह्याबद्दल आश्चर्य वाटतें.

१९१३च्या नोव्हेंबरांत, एके संध्याकाळीं–ती तेरा तारीख होती–कलकत्त्याच्या 'एम्पायर' ह्या सायंदैनिकांत रवीन्द्रनाथांना आठ हजार पौंडांचें स्वीडिश अकादमीकडून नोबेल पारितोषिक मिळाल्याचें प्रसिद्ध झालें. ह्या सायंदैनिकानें लिहिलें होतें : " It is the first recognition of the indegenous literature of this Empire as a world force; it is the first time that an Asiatic has attained distinction at the hands of the Swedish Academy and this is the first occasion upon which the £ 8000 prize has been awarded to a poet who writes in a language so entirely foreign to the awarding country--to Swedan. "

रवीन्द्रनाथांना मिळालेल्या ह्या पारितोषिकाची वार्ता वाऱ्यासारखी सर्व देशभर पसरली. ज्याचें नांव आपण आजवर कधीहि ऐकलें नाही असा हा बंगाली कवि आहे तरी कोण? असें लोक विचारूं लागले. महाराष्ट्र ह्या वार्तेनें तर विस्मयचकितच झाला. त्याला बंकिमचन्द्र चट्टोपाध्याय, रमेशचन्द्र दत्त, चण्डिचरण सेन, देवीप्रसाद रायचौधुरी, हराणचन्द्र रक्षित, सत्यचरण शास्त्री, सतीशचन्द्र चक्रवर्ती, जलधर सेन, जोगेन्द्र चट्टोपाध्याय ह्यांचीं नांवें ठाऊक होतीं. ह्या साऱ्यांच्या मराठींत अनुवादिलेल्या कादंबऱ्या त्यानें आवडीनें वाचल्या होत्या; तोरु दत्त, मायकेल मधुसूदन दत्त, गिरीन्द्रमोहिनीदेवी ह्यांच्या कवितांचा रस त्यानें चाखला होता; दीनबंधु मित्र ह्यांचें 'नीलदर्पण'; अमृतलाल बोस ह्यांची 'तरुबाला', 'विजयवसंत' व 'विवाहविभ्राट्'; हरनाथ बसु ह्यांचें 'जागरण'; मधुसूदन दत्त ह्यांचीं 'पद्मावती' व 'कृष्णकुमारी' हीं नाटकें मोठ्या रसिकतेनें त्यानें वाचलीं होतीं; पण रवीन्द्रनाथांची कोणतीहि कृति त्यानें वाचिली नव्हती. 'प्रकृतीर प्रतिशोध' आणि 'राजा ओ राणी' हीं दोन नाटकें रवीन्द्रनाथांनी महाराष्ट्रांत बसून लिहिलीं. पहिलें कारवारांत (१८८४) व दुसरें सोलापुरांत (१८९३). 'बालक' ह्या मासिकासाठी लिहिलेल्या अनेक निबंधांपैकी कांही निबंध त्यांनी आपल्या सोलापुरांतील वास्तव्यकालांत लिहिले. १८८५ सालीं रवीन्द्रनाथांचे वडील महर्षि देवेन्द्रनाथ शारीरिक स्वास्थ्याकरिता मुंबईजवळील वांद्रें ह्या गावीं समुद्रकिनारीं कांही महिने येऊन राहिले होते. त्या वेळीं पितार्जीचा आजार विशेष वाढलेला ऐकून त्यांच्या सेवेकरिता त्यांजकडे ते दोन महिने येऊन राहिले होते. वांद्रें येथून त्यांनी लिहिलेल्या पत्रांपैकी एक पत्र 'Glimpses of Bengal' ह्या पुस्तकांत आढळतें. ह्या पत्रांत वांद्रें येथील समुद्राचें त्यांनीं केलेलें वर्णन वैशिष्ट्यपूर्ण आहे. ह्या सागरतीरीं बसून त्यांनी महर्षि देवेन्द्रनाथांच्या बंगाली 'आत्मचरित्रा'चें प्रकाशनयोग्य असें परिष्करण केलें. 'आव्हानसंगीत' ही त्यांची प्रसिद्ध कविता त्यांनी तेथेच लिहिली. १८८५ सालीं इंडियन नॅशनल कॉंग्रेसची प्राणप्रतिष्ठा होऊन त्याचें पहिलें अधिवेशन डब्ल्यू. सी. बानर्जी ह्यांच्या अध्यक्षतेखालीं मुंबईंत भरलें. ह्या अधिवेशनास सर्व प्रांतांतून प्रतिनिधि आले होते, परंतु बानर्जीखेरीज कोणी बंगाली प्रतिनिधि आलेले त्यांना आढळले नाहीत. राजकीय क्षेत्रांतील, विशेषतः ह्या ऐतिहासिक अधिवेशनाच्या प्रसंगीं बंगाल्यांची अनुपस्थिति व उदासीनता पाहून त्यांना जो खेद वाटला तो त्यांनी वरील कवितेंत जळजळीतपणें व्यक्त केला आहे. ते म्हणतात :

" पृथिवी जुडिया वेजेछे विषाण शुनिते पेयेछि ओइ—
'सवाइ एसेछे लइया निशाण, कइ रे बंगाली कइ । '

" देश एकजूट होऊन शिंग वाजतें आहे; तें ऐकूं येतें आहे मला— सारेजण झेंडे घेऊन आले आहेत; पण त्यांत वंगाली कुठे आहे; कुठे आहे वंगाली ? "

कॉंग्रेसच्या ह्या अधिवेशनाच्या चालकांकडून त्या वेळच्या तरुण वंगालचे जहाल नेते सुरेन्द्रनाथ वानर्जी, आनंदमोहन वोस ह्यांसारख्यांस आमंत्रण गेलें नव्हतें; त्यांना बुद्धिपुरस्सर दुर्लक्षिण्यांत आलें असें म्हणतात. भारतीय राजकारणाच्या क्षेत्रांत वंगाल्यांना स्थान नाही, त्यांचा उलट अवमानच केला जात आहे असा मनांत विचार येऊन तरुण रवीन्द्रनाथांना विषाद वाटला. हा विषाद त्यांनी ह्या कवितेंत व्यक्त केला आहे. रवीन्द्रनाथांचें असें हें लेखन व वास्तव्य महाराष्ट्रांत घडलें असतां महाराष्ट्राला तें ज्ञात नव्हतें. १९१३ अखेर इतर भाषिकांप्रमाणेच महाराष्ट्रियांत रवीन्द्रनाथांबद्दल कुतूहल जागृत झालें. येथे एक गोष्ट सांगितली पाहिजे ती अशी की, रवीन्द्रनाथ १९१३ पर्यंत महाराष्ट्राला जरी ज्ञात नव्हते तरी महाराष्ट्राचे दोन महान् नेते लोकमान्य वाळ गंगाधर टिळक व नामदार गोपाळ कृष्ण गोखले ह्यांना ते चांगलेच ज्ञात होते. लो. टिळक व रवीन्द्रनाथ ह्यांचा परस्परांशीं प्रत्यक्ष संबंध जरी १९१७ सालीं आला असला तरी प्रसिद्ध महाराष्ट्रीय वंगाली लेखक व वृत्तपत्रकार सखाराम गणेश देउसकर आणि रवीन्द्रनाथांची एक भाची सरलादेवी घोषाल ( पुढे सरलादेवी चौधुराणी ) ह्यांच्या द्वारा परस्परांच्या विचारांची देवाण–घेवाण तत्पूर्वी बऱ्याच वर्षांपासून होऊं लागली होती. गणेशोत्सव व शिवाजी-उत्सव ह्यांच्या धर्तीवर ' वीराष्टमी '; ' प्रतापादित्य-उत्सव ', ' उदयादित्य-उत्सव ', व पुढे १९०४ सालीं प्रत्यक्ष ' शिवाजी-उत्सव ', कलकत्त्यांत साजरे होऊं लागले. त्यांचे प्रमुख चालक सखाराम गणेश देउसकर आणि सरलादेवी चौधुराणी हीं असलीं तरी त्यांना प्रेरणा देणाऱ्या व्यक्ति रवीन्द्रनाथ व लोकमान्य टिळक ह्याच होत्या. १९०४ सालीं रवींद्रनाथांनीं देउसकरांच्या ' शिवाजीर दीक्षा ' ह्या पुस्तकासाठी ' जयतु शिवाजी ' ही कविता लिहून दिली. ह्या कवितेचें मराठींत भाषांतर करून देउसकरांनी तें लोकमान्य टिळकांकडे पाठविलें असतां त्यांनी रवीन्द्रनाथांना, त्यांच्या ह्या कवितेंतील एका ओळीचा पुनरुच्चार करून पत्र लिहून कळविलें होतें कीं, " The great name of Shiwaji would certainly bind Maharashtra and Bengal together without a war, now. " [ वंग–मराठारे एक करि दिवे विना रणे ]. १९०८ सालीं राजरोष होऊन सहा वर्षे कारागृहवासांत राहण्याचा प्रसंग त्यांजवर न येता तर रवीन्द्र-टिळक संबंध अधिक वाढला असता व महाराष्ट्राला रवीन्द्रपरिचय जो उशिरा झाला तो लवकर झाला असता. लोकमान्य टिळकांप्रमाणेच नामदार गोपाळ कृष्ण गोखले ह्यांचाहि रवीन्द्रनाथ व त्यांचें काव्य ह्यांच्याशीं परिचय होता. रवीन्द्रनाथांना गोखल्यांचे गुरु न्या. मू. महादेव गोविंद रानडे ह्यांजबद्दल फार आदर वाटे, त्यामुळेहि हे दोघे एकमेकांच्या निकट आले असावे. रवीन्द्रनाथांचे एक स्नेही व लाहोर येथील ट्रायब्यून ह्या दैनिकाचे माजी संपादक नगेन्द्रनाथ गुप्ता आपल्या ' Reflections and Reminiscences ' ह्या पुस्तकांत लिहितात :

" I remember several years before Rabindranath received the Nobel Prize, Gopal Krishna Gokhale, the politician and mathematician, learned the Bengali language for the express purpose of reading Rabindranath's poems in the original Bengali. Gokhale on one occasion, read out to me a few poems, apologising for his inability to reproduce the Bengali accent and enunciation, and then asked me to read the same poems in the manner of a Bengali. "

रवीन्द्रनाथांना नोबेल पारितोषिक मिळेपर्यंत, टिळक, गोखले किंवा त्यांच्या भोंवतालची मंडळी वगळल्यास महाराष्ट्राला त्यांचें नांव किंवा सारस्वत मुळीच माहीत नव्हतें असेंच म्हणावें लागेल. पारितोषिकाची वार्ता ऐकल्यावर आणि त्या सुमारास इंग्रजी वर्तमानपत्रांतून व मासिकांतून रवीन्द्रनाथांसंबंधी जे लेख येत होते ते किंवा त्यांचीं होणारीं मराठी भाषांतरें वाचून, युरोपिअन आणि अमेरिकन लोक ज्या अर्थी रविबाबूंची एवढी स्तुति करतात आणि त्यांना आशियांतील कोणाहि व्यक्तीला आजवर न मिळालेलें भलें मोटें पारितोषिक एक स्वीडिश अकादमी देते, त्या अर्थी ते फार मोठे असले पाहिजेत आणि त्यांचें सारस्वताहि असाधारण गुणांनी समृद्ध असलें पाहिजे, असें लोकांना वाटूं लागलें. त्यांची आंतरराष्ट्रीय कीर्ति ऐकून ते दिपून गेले. अंदमानच्या अंधाऱ्या कोठडींत देशाच्या मुक्तीच्या विचारांत मग्न असलेल्या वीर विनायकराव सावरकर ह्यांची कित्येक काळपर्यंत स्तब्ध असलेली रुद्रवीणा, ही वार्ता ऐकून हर्षाने अकस्मात् झंकारली आणि तिच्यांतून 'रवीन्द्र-अभिनंदनगीता' चे बोल बाहेर पडले. भारतीय महाकवि होऊन तोरण होण्याची स्वतः सावरकरांची मनीषा होती, पण सहाणेवर झिजत राहून देवतेचा ताप हरण्याचें कार्य त्यांच्या वांट्यास आलें. पण आपली ही अपूर्ण मनीषा कोणातरी भारतीयाने पूर्ण केली; आपल्या प्रतिभेने दिपवून आणि वीणारवाने गुंगवून त्याने दोन्ही गोलार्धांत अपार कीर्ति मिळविली ह्याबद्दल त्यांना हर्षच झाला. हा हर्ष त्यांनी ह्या रवीन्द्र-अभिनंदनगीतांत व्यक्त केला आहे. आपल्या गीताच्या शेवटीं ते म्हणतात: "कालिदासानंतर त्याची वीणाहि लुप्त झाली. ती वीणा पुन्हा भारतांत अवतरून रवीन्द्रनाथांच्या हातीं आली आहे, आणि आपल्या स्वर्गीय झंकारांनी साऱ्या जगाला डुलवीत आहे, हें पाहून अत्यंत अभिमानाने, हे कवे, मी तुला वंदन करतों." सावरकरांनी आपली ही कविता रवीन्द्रनाथांना अंदमानहून पाठविली होती.

रवीन्द्रनाथांचें जीवन आणि त्यांचें सारस्वत ह्यासंबंधी आता शोध व चौकशी होऊं लागली. १९१४ च्या प्रारंभापासून स्ट्रँड व पियर्सन्स् मॅगेझीनच्या धर्तीवर निघूं लागलेल्या 'नवयुग' ह्या मासिकांत इंग्रजी गीतांजलीचा अनुवाद क्रमशः प्रसिद्ध होऊं लागला. हा अनुवाद करणारे गोविंद वासुदेव कानिटकर हे स्वतः एक चांगल्यापैकी कवि होते. ह्याच वर्षी 'चोखेर बाली' ह्या कादंबरीचा 'पतिपत्नी-प्रेम' ह्या नांवाने श्री. वालचंद कोठारी ह्यांनी अनुवाद प्रसिद्ध केला. रवीन्द्रनाथांची मराठींतील ही पहिली अनुवादित कादंबरी. नरसिंह चिंतामण केळकर ह्यांनी हिला एक विस्तृत प्रस्तावना लिहिली आहे. 'चोखेर बाली'चा अनुवाद प्रसिद्ध झाल्यापासून आतापर्यंत सत्तेचाळीस वर्षांच्या काळांत रवीन्द्रनाथांच्या 'बौ-ठाकुराणीर हाट', 'नौका डुबी', 'गोरा', 'राजर्षि', 'घरे बाइरे', 'मुकुट', 'योगा-योग', 'चतुरंग', 'नष्टनीड' व 'मालंच' ह्या कादंबऱ्या मराठींत अनुवादित झाल्या आहेत. रवीन्द्रनाथांनी (आपल्या) शेवटच्या काळांत नूतनत्वाचा कल्लोळ उठविणाऱ्या आधुनिकांपुढे (मॉडर्निस्ट्स्) आदर्श म्हणून ठेवण्याकरिता 'दुई बोन', 'शेषेर कविता', 'चार अध्याय' ह्या ज्या तीन अपूर्व कादंबऱ्या लिहिल्या त्या आमच्या तरुण पिढीपुढे अद्याप आलेल्या नाहीत. 'नूतनत्व'चा जयघोष करणाऱ्या चालू पिढींतील कोणी तरुण लेखक त्यांचा अनुवाद करण्यास पुढे येवो अशी आपण अपेक्षा करूं या. ह्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्यास खरें 'नूतनत्व' व खरी 'आधुनिकता' कशांत असते तें आमच्या आधुनिक नूतनांना नीट कळेल.

रवीन्द्रनाथांच्या कादंबऱ्या महाराष्ट्रीय वाचकवर्गाला फार आवडल्या आहेत. पण शरच्चंद्रांच्या कादंबऱ्यांइतकी मात्र त्यांना लोकप्रियता लाधलेली नाही. ह्याचें कारण त्यांचा

अनुवाद जसा वठावा तसा वठलेला नाही. काका कालेलकर ह्यांनी मूळ बंगालीवरुन अनुवादि-लेली 'मालंच' आणि शि. गो. भावे ह्यांनी इंग्रजीवरुन अनुवादिलेल्या 'घरे बाइरे' व 'चतुरंग' ह्या तीन कादंबऱ्या वगळल्यास बाकीच्यांचे अनुवाद यथातथाच आहेत. रवीन्द्र-नाथांच्या कादंबऱ्या काय किंवा लघुकथा काय, त्यांच्याप्रमाणेच ज्याची शैली गीतधर्मी, चित्रधर्मी व संयमशील आहे, तोच त्यांचे अनुवाद यथातथ्य वठवूं शकेल.

महाराष्ट्रीय वाचकांना रवीन्द्रनाथांच्या कादंबऱ्यांपेक्षा त्यांच्या लघुकथा अधिक प्रिय आहेत. त्यांना वासुदेव गोविंद आपटे, शि. गो. भावे, व्यं. शं. वकील ह्यांसारखे उत्तम शैलीकार अनुवादकहि लाभले. रवीन्द्रनाथांची लघुकथा मराठींत सर्वांत प्रथम अनुवादित करून प्रसिद्ध करण्याचा मान शि. गो. भावे ह्यांजकडे जातो. 'शेषेर रात्री' ('मावशी') ही ती कथा होय. १९१८ साली चित्रमयजगत् ह्या मासिकांत ती प्रसिद्ध झाली.

मराठींत आतापर्यंत, रवीन्द्रनाथांच्या लघुकथांचे छोटे-मोठे असे सहा संग्रह प्रसिद्ध झालेले आहेत. ह्या लघुकथांनी आमच्या मराठी लघुकथालेखकांसमोर एक नवा आदर्श ठेवला. मराठी लघुकथेचा आज जो आश्चर्यकारक विकास झालेला आढळतो त्याचें बरेंचसें श्रेय रवीन्द्र-नाथांना आहे, असें मी म्हटल्यास तें खास अतिशयोक्तीचें ठरणार नाही. 'गीताञ्जली'तील रवीन्द्रनाथांहून अगदीं वेगळ्या प्रकारच्या रवीन्द्रनाथांचें दर्शन आमच्या मराठी लघुकथा-लेखकांना घडलें असावें.

रवीन्द्रनाथांची लघुकथा ही भारतीय वाङ्मयालाच नव्हे तर जगाच्या ललित वाङ्मयाला लाभलेली एक फार मोलाची देणगी आहे. साहित्य अकादमीने त्यांच्या केवळ एकवीसच लघुकथा* प्रसिद्ध करून न थांबतां सर्वच्या सर्व लघुकथा प्रसिद्ध करावयाला हव्यात. मात्र वर सांगितलेले गुण ज्याच्यांत आहेत अशाच लेखकाकडून तें करून घेण्यांत यावें.

रवीन्द्रनाथांच्या लघुकथा व कादंबऱ्या ह्यांच्याहून पुष्कळच कमी आकर्षण त्यांच्या 'गीताञ्जली'बद्दल महाराष्ट्रीय वाचकांना वाटतें. 'गीताञ्जली'चे मराठींत, पद्यरूपांत तीन व गद्यरूपांत चार, असे सात अनुवाद प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांपैकी एक गद्यानुवाद मराठी कादंबरीचे जनक हरि नारायण आपटे ह्यांनी केलेला असून, त्याला त्यांनी रसग्रहणात्मक अशी सुंदर मार्मिक प्रस्तावना जोडली आहे.

'गीताञ्जली'च्या प्रसिद्ध झालेल्या सात मराठी अनुवादांव्यतिरिक्त काकासाहेब कालेलकर ह्यांनी त्यांतील कांही गीतें निवडून त्यांवर, 'रवीन्द्रमनन' ह्या नांवाचें एक मननात्मक, मार्मिक, सुंदर पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. काकासाहेब कालेलकर ह्यांचें हें 'रवीन्द्रमनन', रवीन्द्रनाथांची 'गीताञ्जली'तील आध्यात्मिक दृष्टि समजण्याच्या दृष्टीने फार महत्त्वाचें आहे. 'गीतांजली'तील गीतांचा आस्वाद घेतांना त्यांना त्यांतील जें जीवनरहस्य पटलें तें इतर रसिकांना पटवून देण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे आणि तो पुष्कळसा सफल झाला आहे. त्यांच्या पूर्वी 'गीतांजली'चें यथार्थ स्वरूपदर्शन घडविण्याचा कोणीहि प्रयत्न केला नव्हता. पण त्यांचा हा प्रयत्न कांही अंशीं अपुरा वाटतो. गीतधर्मी व सुरवैचित्र्यसंपन्न असलेल्या 'गीतांजली'तील गीतांचें सौंदर्य व त्यांतील उच्च आध्यात्मिक भाव तीं गद्यरूपांत

---

* 'एकविंशति', अनुवादक मामा वरेरकर. रवीन्द्रनाथांच्या शैलींतील गीतधर्मित्व, चित्रधर्मित्व व संयमशीलता ज्याच्या शैलींत नाही, असा लेखक मुळाचा किती विचका करतो त्याचें हा अनुवाद हें एक उदाहरण आहे.

वाचून वाचकांच्या प्रत्ययाला संपूर्णतया येणें अगदीं अशक्य आहे. ' गीतांजलींतील कित्येक गीतें अशीं आहेत कीं, त्यांच्या स्वरयोजनेला धरून तीं न गाइल्यास श्रोत्यांच्या मनांवर अपेक्षित संस्कार जितक्या उत्कटत्वाने उमटावा तितका तो उमटत नाही; भावसागरावर इष्ट लहरी सारख्या लहरत राहून, संवादी नादप्रतिमा प्रतिक्षणीं जशा प्रवाहित होत राहावयाला हव्यात तशा त्या प्रवाहित होत राहात नाहीत. त्यामुळे आशयाची अभिव्यक्ति अस्पष्ट होऊन, प्रत्ययाचा आनंद जेवढा उपभोगावयाला, मिळावयाला हवा तेवढा मिळत नाही. ह्यासाठी ' गीतांजली 'तील भावसौंदर्य व इंद्रियातीत आध्यात्मिक अनुभव अनुभवावयाचा असेल तर ज्या विशिष्ट सुरांत त्यांतील गीतें बांधलीं गेलीं आहेत, ते सूरच ऐकले पाहिजेत; आणि म्हणूनच शान्तिनिकेतनांत अनेक वर्षे संगीताचे अध्यापक असलेले एक महाराष्ट्रीय संगीतज्ञ पंडित भीमरावशास्त्री हसूरकर ह्यांनी गीतांजलि स्वरलिपीसह देवनागरी लिपींत प्रसिद्ध करण्याचा उद्योग जेव्हा आरंभला तेव्हा गुरुदेवांनी त्यांना उत्साहाने पाठिंबा दिला.* भीमरावशास्त्र्यांनी आपल्या ' संगीत गीतांजलि ' ह्या पुस्तकांत स्वरलिपीबरोबरच प्रत्येक गीताचा ' राग ', ' ताल ' व ' लय ' दिला आहे. गीतांची स्वरलिपि कोणतें तत्त्व पुढें ठेवून तयार केलें आहे ह्याचेंहि स्पष्टीकरण पुस्तकाच्या प्रारंभीं केलें आहे. गुरुदेव हयात असतां, पंडित भीमरावशास्त्री ह्यांनी त्यांच्या नजरेखाली ही ' संगीत गीतांजलि ' तयार करून १९२७ सालीं प्रसिद्ध केली. आमच्या मराठी साहित्यिकांना व वाचकांना, आपल्या प्रांतांतील एका संगीतज्ञाने असा कांही उद्योग केला आहे ह्याची वार्ताहि नाही. भारतांतील इतर प्रांतांतहि ह्या पुस्तकाची कितपत माहिती असेल, ह्याचीहि शंका वाटते. हें पुस्तक अलीकडे मिळतहि नाही. विश्वभारतीने किंवा साहित्य अकादमीने ह्या पुस्तकाचे हक्क मिळवून तें प्रसिद्ध केल्यास रवीन्द्र-गीतांच्या अभ्यासकांवर फार मोठे उपकार होतील. त्याचप्रमाणे इंदिरादेवींच्या ' स्वरविताना 'चेंहि देवनागरीकरण व्हावयाला हवें, आणि त्याबरोबरच श्री. शान्तिदेव घोष ह्यांच्या ' रवीन्द्रसंगीत '× ह्या ग्रंथाचें व श्री. धूर्जटीप्रसाद मुखोपाध्याय व रवीन्द्रनाथ ह्यांमध्यें पत्रद्वारा झालेल्या चर्चेचें ' सूर ओ संगति ' हें जें पुस्तक बंगालींत प्रसिद्ध झालें आहे त्याचें, प्रत्येक प्रांतिक भाषेंत भाषांतर होणें आवश्यक आहे. रवीन्द्रनाथांनी अनेक नवीन छन्द आपल्या कवितेंत उपयोगिले आहेत. ह्या नवीन छन्दांचा परिचय करून देणारें पुस्तकहि कुणीतरी अधिकारी बंगाली छन्दशास्त्र्याने तयार करून+ तें सर्व भारतीय भाषांत अनुवादित करून घेऊन प्रसिद्ध करणेंहि तितकेंच आवश्यक

---

* गुरुदेवांनी त्यांना लिहिलेल्या ( ९ मे १९२६ ) एका पत्रांत म्हटलें आहे : " I am glad to see your Hindi edition of my Gitanjali in which you have accurately given the Hindi notation of my Songs which I composed in Bengali. I am particularly happy to find that the work has been done by you, for you have long been here and have taken much pains to master the songs of Gitanjali."

× अलीकडे ह्या पुस्तकाखेरीज ' रवीन्द्रसंगीता 'वर खालील तीन पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत : १. रवीन्द्रसंगीतेर भूमिका; कणिका बन्द्योपाध्याय, वीरेन्द्र बंद्योपाध्याय.

२. रवीन्द्रनाथेर गान; सौरेन्द्रनाथ ठाकूर.

३. रवीन्द्रगीतप्रसंग; श्रीप्रफुल्लकुमार दास.

+ प्रस्तुत व्याख्यान झाल्यावर ' छन्दोगुरु रवीन्द्रनाथ ', व ' त्रयी ' अशीं ह्या विषयावर दोन पुस्तकें प्रसिद्ध झालीं असल्याचें मला सांगण्यांत आलें. परंतु हीं पुस्तकें सध्या उपलब्ध नाहीत.

आहे. त्यायोगें रवीन्द्रनाथांचीं गीतें व त्यांच्या कविता ह्यांतील रसमाधुरी चाखणें बंगाली न जाणणाऱ्या लोकांना सुलभ होईल.

मराठींत ' गीतांजली 'चे अनुवाद प्रसिद्ध झाल्यावर तिच्या शैलीचें आणि आविष्करण-पद्धतीचें अनुकरण करून गूढगुंजनात्मक गद्यकाव्य लिहिण्याची महाराष्ट्रांत कांही काळ एक मोठी लाटच उसळली. ही लाट १९३५ नंतर ओसरली. मराठी कवितेने एक नवेंच वळण घेतलें, आणि आज तर आमच्या कवींचे टी. एस्. इलियट, एझ्रा पाउंड, डी. एच्. लॉरेन्स, स्टिफन स्पेंडर, ऑडेन वगैरे पाश्चात्त्य कवि आदर्श बनले आहेत. बंगालींत विष्णु दे, बुद्धदेव बसु, प्रेमेन्द्र मित्र, सुधीन्द्र दत्त हे ज्या वळणाची कविता लिहितात त्या वळणाची कविता ते लिहूं लागले आहेत. रवीन्द्रनाथ हे आधुनिकांहूनहि आधुनिक होते, ह्याची त्यांना गंधवार्ताहि नाही. ह्याचें कारण त्यांच्यासमोर ' पूरबी, ' ' पुनश्च, ' ' पत्रपुट, ' ' श्यामली ' हे त्यांचे कवितासंग्रह आलेले नाहीत. ' शिशुतीर्थ ' किंवा ' शेषेर कविता ' ( ती जरी गद्यांत लिहिलेली कथा असली तरी तिला मी आधुनिक ' चंपूकाव्य 'च मानतों ) ह्यांसारखीं अभिनव व अभिजात काव्यें त्यांना वाचावयास मिळालेलीं नाहीत. कदाचित् कधीं ' Shyamali, ' ' Wings of Death, ' ' The Herald of Spring, ' ' Farewell My Friend ' ह्या त्यांच्या इंग्रजी अनुवादांकडे त्यांची नजर वळल्यास रवीन्द्रनाथांतील आधुनिकतेची त्यांना कल्पना येईलहि. ×

मराठींत गीतांजलींतील गद्यरचनारीतीचें व भावाविष्करण-पद्धतीचें जरी अनुकरण होऊं लागलें होतें तरी द्वन्द्वातीत आनंदानुभवाचा जो सौंदर्यपूर्ण आविष्कार ' गीतांजली 'त पाहावयास मिळतो त्याचें पुसटसुद्धां दर्शन नवीन निर्माण झालेल्या ह्या गद्यकाव्यांत होत नव्हतें. पण त्याच सुमारास रवीन्द्रनाथांप्रमाणेंच सौंदर्यपूजक व गीतधर्मी असलेल्या आमच्या एका थोर कवीच्या कवितेंत ह्या द्वन्द्वातीत आनंदानुभवाचा सौंदर्यपूर्ण आविष्कार प्राचुर्यानें आढळूं लागला होता. हा कवि म्हणजे ग्वाल्हेर येथील भास्करराव तांबे हा होय. तांबे ह्यांच्या नंतरच्या पिढींतील ' अनिल ' ( आत्माराम रावजी देशपांडे ) व आजच्या पिढींतील बा. भ. बोरकर हेहि त्यांच्याच परंपरेंतील. रवीन्द्रकाव्याचा बराच प्रभाव तांबे, अनिल व बोरकर ह्यांच्या कवितेवर पडलेला आहे.

रवीन्द्रनाथांनी अडीच हजारांवर गीतें रचिलीं. एवढी गीतसंख्या जगांतील कोणाहि कवीची आढळत नाही; आणि म्हणूनच बंगाली मोठ्या अभिमानाने म्हणत असतात—

" जगत्–कविसभाय मोरा तोमार करि गर्व्व;
वांगाली आजि गानेर राजा, वांगाली नहे खर्व्व* । "

---

× रवीन्द्रनाथांनी शेवटच्या काळांत लिहिलेल्या कवितांचा परिचय करून देणारें, शिशिरकुमार घोष ह्यांनी लिहिलेलें, ' The Later poems of Tagore ' ( Pub. : Asia Publishing House, 1961 ) हें पुस्तक वाचल्यासहि त्यांच्या ह्या कवितांचें स्वरूप कळून येण्यासारखें आहे. जिज्ञासूंनी तें अवश्य वाचावें.

* " जगाच्या कविसभेंत, गीतसम्राटाच्या स्थानावर एक बंगाली बसलेला पाहून आम्हांला तुझा अभिमान वाटतो; बंगाली हा कांही आता छोटा नाही राहिलेला. "

पण हा अभिमान योग्यच असला तरी त्याच्या आनंदांत त्यांनी मश्गुल होऊन राहतां कामा नये. आपला कवि 'गानेर राजा' (गीतसम्राट्) आहे हें त्यांनी रवीन्द्र-गीतें जगाला गावयाला व ऐकावयाला लावून आणून दिला पाहिजे. त्या गीतसम्राटाचीं गीतें बंगाली लिपींतच बद्ध करून न ठेवतां साऱ्या भारतीयांना वाचता येत असलेल्या देवनागरी लिपींत त्यांच्या स्वरलेखनासह प्रसिद्ध करण्याचा व प्रांतोप्रांतीं रवीन्द्रसभा स्थापून रवीन्द्रसंगीताचा परिचय करून देण्याचा उद्योग जाणत्या बंगाली साहित्यिकांनी व संगीताभ्यासकांनी आरंभावयाला हवा. इतर प्रांतांना रवीन्द्रनाथांच्या मूळ गीतांचा व त्यांच्या संगीताचा कितपत परिचय झालेला आहे हें मला माहीत नाही, परंतु महाराष्ट्रांत मात्र पुणें, मुंबई व नागपूर हीं शहरें वगळल्यास, त्यासंबंधी पूर्ण अज्ञान आढळतें. रवीन्द्रनाथांच्या गीतांचीच काय पण त्यांनी लिहिलेल्या शेकडो वैणिकांची (लिरिक्स), सामान्य वाचकांना तर सोडाच पण आमच्या कवींनाहि वार्ता नाही. त्यांनी रवीन्द्रनाथांची जी कांही कविता वाचली असेल ती इंग्रजींतून आणि इंग्रजी अनुवादांत पुष्कळदा मुळांतील आशय जशाचा तसा उतरलेला आढळत नाही. रवीन्द्रनाथांचें काव्य हें प्रामुख्याने संगीतप्रधान आहे. इंग्रजी अनुवादाला फार तर सुंदर लयबद्ध गद्य (Rhythmic prose) असें म्हणतां येईल. त्या अनुवादांत मुळांतील छंद व लय ह्यांमुळे होणारा परिणाम तर नष्ट झालेला असतोच, पण त्याबरोबरच लयसाम्य साधण्यासाठी जी कांही नाजूक करामत केलेली असते तिचाहि मागमूस राहिलेला नसतो आणि मग कवीच्या कलाकृतींचें कांही वेगळ्याच रूपांत दर्शन घडत असतें. रवीन्द्रकाव्याचें खरें दर्शन, अशाप्रकारच्या ह्या अनुवादामुळे आमच्या मराठी भाषकांना घडूं शकलें नाही, त्यांतील संपूर्ण रस मुळांतून चाखता आलेला नाही.

रवींद्रनाथांच्या ज्या कवितांत संगीताला प्राधान्य नाही अशा कवितांचे अनुवाद मराठींत करण्यांत मात्र कांही जणांना यश मिळालें आहे. विशेषतः 'शिशु'मधील कित्येक कवितांचीं कवि माधव ह्यांनी गद्यांत त्याचप्रमाणें पद्यांत केलेली भाषांतरें. हीं भाषांतरें वाचून रवीन्द्र-प्रतिभेचा एक नवा पैलू मराठी भाषकांना दिसला. त्यांच्या लघुकथांइतक्याच त्यांना 'शिशू'तील कविता प्रिय वाटल्या. 'गांधारीर आवेदन', 'कर्ण-कुंती संवाद', 'विदाय—अभिशाप' ह्या नाट्यकाव्यांचा आचार्य भागवत ह्यांनी केलेला अनुवाद अप्रतिम आहे. महाराष्ट्रांत रवीन्द्रसारस्वताचा अत्यंत बारकाईनें पण रसिकतेने खोल अभ्यास करणारी जी थोडीशी मंडळी आहेत त्यांत आचार्य भागवत हे प्रमुख होत. त्यांनी रवीन्द्रवाङ्मयाचा आपला व्यासंग अखंड चालू ठेवला आहेच, पण अनेक तरुणांचें लक्ष त्याकडे वेधून त्यांनी त्यांना मार्गदर्शनहि केलें आहे. त्यांच्याप्रमाणे त्यांच्याचसारखी प्रवृत्ति असलेले कै. पांडुरंग सदाशिव ऊर्फ साने गुरुजी ह्यांनीहि तरुणांना प्रेरणा दिली. सानेगुरुजींनी मराठींत जें विपुल ललित वाङ्मय निर्माण केलें आहे, त्यावर दोन व्यक्तींच्या विचारांचा व लेखनाचा फार मोठा प्रभाव पडलेला आढळतो. गांधीजी व रवीन्द्रनाथ ह्या त्या दोन व्यक्ति होत. त्यांनी स्वतःचें जीवन व लेखन रवीन्द्रनाथ आणि गांधी ह्यांच्या लेखनाने जसें संस्कारित होऊं दिलें, तसेंच त्यांनी आपल्या चाहत्यांचें जीवन व लेखन संस्कारित करण्याचा प्रयत्न केला. साने गुरुजी ह्यांनी रवीन्द्रनाथांच्या 'स्वदेशी समाज' व 'साधना' ह्या दोन ग्रंथांचा आपल्या सहजसुंदर शैलींत मराठी अनुवाद केला आहे. श्री. श्री. स. गोखले ह्यांनी 'जीवनस्मृती' चें (१९२०) केलेलें भाषांतर, त्याचप्रमाणें १९२६ सालीं रा. गो. कानडे ह्यांनी लिहून प्रसिद्ध केलेलें रवीन्द्रचरित्र व यंदाच्या वर्षी प्रसिद्ध झालेलें वि. स. सुखटणकरकृत 'रवीन्द्रदर्शन', गोपीनाथ

तळवलकरकृत 'शान्तिनिकेतन' व मीं स्वतः प्रसिद्ध केलेली 'रवीन्द्रजीवनकथा' ह्यायोगें महाराष्ट्राला रवीन्द्रनाथांचें जीवन व कार्य ह्यांशीं आतां बराचसा परिचय झालेला आहे.

साने गुरुजी व आचार्य भागवत ह्या दोघांचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष संबंध असलेल्या 'साधना' ह्या साप्ताहिकांत त्याचप्रमाणे 'नवभारत' ह्या मासिकांत रवीन्द्रनाथ व त्यांचें सारस्वत ह्यासंबंधी गेल्या पंधरा-वीस वर्षांपासून मधून मधून अभ्यासपूर्ण, रसग्रहणात्मक व चर्चात्मक लेख येऊं लागले आहेत; आणि नव्या पिढीचें लक्ष बंगाली भाषा शिकण्याकडे वळून ती रवीन्द्रवाङ्मयाचा अभ्यास करण्यास प्रवृत्त होऊं लागली आहे. नव्या पिढींतील कवि श्री. बोरकर व श्री. मंगेश पाडगांवकर ह्यांसारखे उच्च श्रेणींतील प्रतिभासंपन्न कवि रवीन्द्रनाथांच्या वैणिकांचे सुंदर छन्दोबद्ध अनुवाद करूं लागले आहेत. रवीन्द्रनाथांचीं कांहीं गीतेंहि मूळ राग, ताल ह्यांस धरून मराठी वेषांत अवतरत आहेत.* रवीन्द्रनाथांनी जपानी भाषेंतील 'टाका' ह्या प्रकारावरून बंगालींत रूढ केलेला 'कणिका' हा पद्यप्रकार मराठींत रूढ करण्याचा प्रयत्न कांहीं वर्षांपासून सुरू झाला आहे. मराठींत तो आणण्याचें श्रेय श्री. गोपीनाथ तळवलकर ह्यांना आहे. ह्यांनी रचिलेल्या कणिका इतक्या लोकप्रिय झाल्या कीं, माधव ज्यूलियन् ह्या आमच्या श्रेष्ठ कवीनें तशा कणिका स्वतः लिहिल्या, इतकेंच नव्हे तर त्याने 'छन्दोरचना' ह्या आपल्या मराठी ग्रंथांत त्याची जाति ठरवून तिचा 'लीलारति' ह्या जातींत समावेशहि करून टाकला.

रवीन्द्रनाथांच्या कादंबऱ्या व लघुकथा ह्यांचे मराठींत जेवढे अनुवाद झाले आहेत तेवढे इतर कोणत्याहि वाङ्मयप्रकाराचे झालेले नाहीत. रवीन्द्रनाथांनी लिहिलेल्या बत्तीस नाटकांपैकी (ह्यांत मीं त्यांचीं सर्व नाटकें, नाटिका व प्रहसनें ह्यांचा समावेश करतो), फक्त 'मुक्तधारा', 'चित्रांगदा', 'डाकघर' व 'विसर्जन' एवढीं चारच नाटकें अनुवादित झालीं आहेत. मराठी साहित्यिकांचें, विशेषतः नाटककारांचें, रवीन्द्रनाथांच्या नाटकांकडे व त्यांच्या नाट्य-तंत्राकडे विशेषसें लक्ष गेलेलें दिसत नाही. गेल्या जानेवारींत मुंबईंत 'अखिल भारतीय बंगाली साहित्य-संमेलन' भरलें असतां त्याच्या विद्यमानें कलकत्याच्या 'बहुरूपी' या नाट्यसंस्थेने 'रक्तकरबी'चा जो प्रयोग केला तो पाहून मात्र आमचे बरेचसे तरुण नाटककार व नट अंतर्मुख होऊन विचार करूं लागले आहेत. ह्या नाटकाची नेपथ्यरचना व शंभु मित्र व तृप्ति मित्रा ह्यांचा अपूर्व अभिनय हीं पाहून नाट्य, नाट्यदिग्दर्शन व नेपथ्यरचना ह्यांसंबंधीच्या त्यांच्या आजवरच्या विचारसरणीला जबरदस्त धक्का बसला. रवीन्द्रनाथांचीं नाटकें व त्यांचें तंत्र ह्यासंबंधींचें त्यांचें आजवरचें औदासीन्य हळू हळू मावळत चाललें आहे. आणि कांहीं उत्साही तरुण नट व नाट्यदिग्दर्शक शंभु मित्राच्या मार्गानें जाण्याचा प्रयत्न करीत आहेत. त्यांत त्यांना यश येवो असें आपण इच्छूं या. कदाचित् कांहीं काळानंतर महाराष्ट्राच्या रंगभूमीवर रवीन्द्रनाथांचीं नाटकें प्रभावीपणें चमकतीलहि.

इतर भारतीय प्रांतांतील भाषांत रवीन्द्र-वाङ्मय किती प्रमाणांत उतरलें आहे ह्याची मला कल्पना नाही. मराठींतील प्रमाण मात्र अत्यल्प आहे. तीनशेंहून अधिक असलेल्या रवीन्द्रनाथांच्या छोट्या-मोठ्या ग्रंथांतून जेमतेम ३६ ग्रंथ मराठींत अनुवादित केले गेले आहेत;

---

* कांहीं महिन्यांपूर्वी ऑ. इं. रेडिओने, शान्तिनिकेतनांतील रवीन्द्रसंगीताचे एक जाणकार गायक शान्तिदेव घोष ह्यांच्या मार्गदर्शकत्वाखाली रवीन्द्रनाथांचीं पंचवीस गीतें मराठींत बसवून घेऊन तीं मुंबई, पुणें व नागपूर ह्या केंद्रांवरून ध्वनिक्षेपित केलीं.

आणि तेंहि तीन-चार वाङ्मयप्रकारांपैकी. बंगालींत रवीन्द्रनाथांनी निर्माण केलेली साहित्यसृष्टि पाहिली म्हणजे असें दिसतें की, असा एकहि वाङ्मयप्रकार नाही की, जो त्यांनी हाताळलेला नाही. नृत्य, संगीत व चित्रकला ह्या क्षेत्रांतील त्यांचें कार्य तर अतुलनीयच आहे. त्यांच्या ह्या विविध, वैचित्र्यपूर्ण, बहुरंगी, बहुढंगी सृष्टीचा जेव्हां जवळून नीट परिचय होईल, तेव्हाच ह्या महान् वाङ्मयऋषीचें संपूर्ण दर्शन घडेल, त्याच्या ध्येयवादाचें आकलन होईल, मानवाला जी जीवनदृष्टि देण्यासाठी ते साऱ्या आयुष्यभर धडपडत होते त्याचें महत्त्व कळेल. पण ह्या रवीन्द्रसाहित्यसृष्टीचा परिचय कसा होणार? कोण करून देणार?

चालू वर्ष हें रवीन्द्र-शताब्दी म्हणून गाजत आहे. सभा, संमेलनें, प्रदर्शनें, परिसंवाद ह्यांची सर्वत्र झिम्मड सुरू आहे. रवीन्द्रस्मरणार्थ नृत्य, नाट्य आणि संगीत ह्यांनी तर देश इतका दणाणून गेला आहे की, केव्हा केव्हा असा भास होतो की, रवीन्द्रनाथ म्हणजे नृत्य, नाट्य व संगीत; दुसरें कांही नाही. प्रत्येक राज्यांत आज रवीन्द्रनाथांचें स्मारक म्हणून जें व्हावयाचें आहे तें नाट्यगृहाच्या रूपांत. नाट्यगृहें बांधण्याच्या बाबतींत राज्याराज्यांत कोण स्पर्धा चालली आहे! आमच्या महाराष्ट्र राज्याच्या राजधानींत – मुंबईत – असेंच एक मोठें नाट्यगृह १५ लाख रुपये खर्च करून बांधलें जात आहे. तेथे निर्माण व्हावयाचें आहे एक कला-केंद्र. रवीन्द्र-साहित्यकेन्द्र नव्हे. गरीब बापड्या रवीन्द्र-साहित्याची कोणी दादहि घ्यावयाला तयार नाहीं. वाटलें होतें की, रवीन्द्रनाथांच्या स्मरणार्थ बांधल्या जाणाऱ्या ह्या नाट्यगृहांत शान्तिनिकेतनमधील 'रवीन्द्रसदना'च्या धर्तीवर 'रवीन्द्र म्यूझियम' स्थापन होईल, त्यांत रवीन्द्रनाथांचें व रवीन्द्रनाथांवर लिहिलेलें सर्व भाषांतील वाङ्मय संगृहीत केलेलें असेल; रवीन्द्रसंगीताचा परिचय करून देण्यासाठी 'रेकॉर्ड्स्' टेविलेलीं असतील; रवीन्द्रनाट्याचा सर्वांगीण अभ्यास करण्याची सोय केलेली असेल; त्यांच्या वाङ्मयाच्या खास अभ्यासासाठी रवीन्द्र-अकादमी स्थापन केलेली असेल. पण तें एक दिवास्वप्नच ठरूं पाहत आहे. त्या दिशेने आज तरी महाराष्ट्रांत, कांही घडतांना दिसत नाही. जें कांही मधून मधून घडत आहे तें फक्त 'नृत्य, नाट्य आणि संगीत,' आणि तेंहि अस्सल रवीन्द्रमार्गी नव्हे. पुढेहि तेंच घडत राहणार, अशींच चिन्हें दिसत आहेत.

आज आपण येथे आपल्या मायभाषेंत रवीन्द्रवाङ्मय किती अवतरलें, प्रादेशिक वाङ्मयावर त्याचा कुठवर प्रभाव पडला, ह्याचा आढावा घेण्याकरिता एकत्र जमलों आहों. माझ्या कुवतीप्रमाणे माझ्या भाषेपुरता तो आढावा मी आपल्यापुढे ठेविला आहे. मला तो समाधानकारक वाटत नाही आणि आपल्यालाहि तो वाटेल असें वाटत नाही. मी मघा म्हटल्याप्रमाणे विविध, वैचित्र्यपूर्ण, बहुरंगी, बहुढंगी रवीन्द्रसृष्टीचा जवळून परिचय होऊन रवीन्द्रनाथांचें सत्य व संपूर्ण दर्शन माझ्या भाषाबांधवांना अद्याप झालेलें नाही. तें घडावें ह्यासाठी प्रयत्न व्हावयाला हवे आहेत. ते कोण करणार? कसे आणि केव्हा करणार? मी विचारीत असलेला हा प्रश्न आपल्यापैकी अनेकांच्या मनांत ह्या वेळीं घोळत असेल. येथे सर्व राज्यांतील थोर थोर साहित्यिक उपस्थित आहेत; त्यांपैकी कांहीजण तरी माझ्या ह्या प्रश्नास उत्तर देण्यास पुढे येतील अशी मी अपेक्षा करतों.

माझ्या प्रांतांतील वस्तुस्थिति आपण ऐकलीत व इतर प्रांतांतीलहि आपण आठवडाभर ऐकाल. पण पुढे काय? ततः किम्।

* * *

मूळ लेखक : **श्रीप्रकाश**, राज्यपाल, महाराष्ट्र राज्य

अनुवादक : **वि. वि. पटवर्धन**

# *श्री मैथिलीशरण गुप्त**

फार दिवस झाले त्या गोष्टीला—किती वर्षें झालीं तेंहि माहीत नाही; नक्की सालहि स्मरणांत नाही—की जेव्हा कविवर श्री मैथिलीशरण गुप्त यांची आणि माझी पहिली भेट घडली. जितकें आठवतें त्याप्रमाणें, मी त्या वेळीं कॉलेजांत शिकत होतों; आणि माझ्या स्मृतींत कांही गल्लत झालेली नसेल तर, मैथिलीशरणांची 'भारत-भारती' ही रचना त्याच वेळीं प्रकाशित झाली होती, आणि तिचा बोलबालाहि तेव्हा बराच झाला होता. मैथिली-शरणांचें वय त्या वेळीं काय होतें हें मला नक्की सांगतां येत नाही. तें जरी आज सत्तरीच्या घरांत आहेत तरी माझ्यापेक्षा केवळ पांच वर्षांनीच मोठे आहेत. यावरून त्यांची ख्याति फार तरुणपणींच झाली असावी हें स्पष्टच आहे. खरोखर ही एक प्रशंसनीय नि संतोषजनक गोष्ट म्हटली पाहिजे. कारण, या निमित्ताने ते आम्हां मित्रांना आणि प्रशंसकांना त्यांचा सत्तरावा वाढदिवस साजरा करण्याची सुसंधि प्राप्त करून देत आहेत. ही एक दुःखद परंतु सत्य गोष्ट आहे की, ज्या व्यक्तींचा पराक्रम नि वैभव हीं त्यांच्या तरुणपणींच प्रकाशित झालेलीं पाहावयास सापडतात, त्यांचें आयुष्यहि त्या प्रमाणांत कमीच झालेलें आढळून येतें. अर्थात् कविवर मैथिलीशरण गुप्त या नियमाला सुंदर अपवाद आहेत. आम्हां सर्वांना या गोष्टीचा अभिमान वाटतो आणि त्यामुळेच आज आम्ही आमचें स्वतःचें आणि त्यांचें अभिनंदन करूं शकत आहों.

मैथिलीशरणांची आणि माझी पहिली भेट, त्यांचे स्नेही श्री शिवप्रसाद गुप्त यांच्या काशीच्या जुन्या, राहत्या वाड्यांत झाली. श्री शिवप्रसाद हे तरुण असल्यापासूनच, काशीच्याच नव्हे तर उभ्या देशव्यापी सार्वजनिक जीवनाचें केंद्र बनून राहिले होते. त्यांच्या अकाली मृत्यूबद्दल त्यांचे सारे मित्र आणि सहकारी, जोंपर्यंत ते स्वतः जिवंत असतील तोंपर्यंत दुःखच करीत राहतील. काशीच्या साऱ्या सार्वजनिक संस्थांचें पोषण तर ते करीत होतेच, परंतु काशीबाहेरच्याहि कितीतरी सार्वजनिक संस्थांना ते साहाय्य करीत. देशांतील एकूण एक थोर व्यक्ति यांच्याकडे आल्यावाचून राहिल्या नाहीत. यांच्या विशाल हृदयांत केवल राजकारणाशीं संबद्ध असलेल्या व्यक्तींनाच नव्हे, तर सर्व क्षेत्रांतील विभूतींना स्थान होतें. सार्वजनिक विषयांतील मतभेदांमुळे, व्यक्तिगत मैत्रीच्या संबंधांत त्यांनी कधींहि बाध आणला नाही. सामाजिक आणि नैतिक सुधारणांबाबत त्यांना खूप प्रेम होतें व त्याकरिता ते स्वतः श्रमहि करीत; परंतु राजकारण आणि वाङ्मय हींच त्यांचीं प्रमुख कार्यक्षेत्रें होतीं. राजकारणाच्या आणि वाङ्मयाच्या क्षेत्रांतील सारीं थोर थोर माणसें त्यांच्या येथे येत असत.

माझी व शिवप्रसादजींची मैत्री बालपणापासून होती. याचबरोबर साऱ्या सार्वजनिक कार्यांतहि आमचें निकटचें सहकार्य होतें. त्याचमुळे कविवर मैथिलीशरण गुप्तांची व माझी पहिली

* 'राष्ट्रकवि मैथिलीशरण गुप्त अभिनंदन-ग्रन्थांतील' ( १९५९ ) मूळ हिन्दी लेखाचा अनुवाद. ( पृ. २६—२९ )

भेट त्यांच्याच वाडयांत झाली, यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीच नाही. त्या वेळीं झालेल्या कांही गप्पाहि मला आठवतात; परंतु पोरवयांतील वार्तालापांचें स्वरूप त्यांना असल्यामुळे, या वेळीं त्या येथे उद्धृत करणें अयोग्य ठरेल. त्या काळीं इंग्रजीचा फार जोर होता, आणि हिंदीला कांहीच महत्त्व दिलें जात नव्हतें. तेव्हाच्या गोष्टी आठवल्या म्हणजे आज हसूं येतें आणि त्याचबरोबर दुःखहि होतें. त्या वेळीं मीहि कांही अनुचित बोललों असेन तर कांही आश्चर्य वाटण्याचें कारण नाही. परंतु मैथिलीशरणजी तेव्हापासून हास्यविनोदाचे चाहते होते; आणि त्याचबरोबर सहिष्णुता वृत्तीहि त्यांच्या ठिकाणीं पुष्कळच होती. ही त्यांची विशेषता आजतागायत त्यांच्यामध्ये सुयोग्य प्रमाणांत अस्तित्वांत आहे. जर माझ्यासारख्या त्या वेळच्या नवयुवकांना हिंदी भाषा थोडीफार माहीत असेल तर ती संस्कृत भाषेमुळेच; किंवा तुलसीदास, सूरदास इत्यादि भक्तजनांच्या रचनांच्या द्वारा. कारण संस्कृतचा अभ्यास आम्हांला मोठ्या कष्टाने करावाच लागे; आणि घरोघरीं वरील भक्तजनांच्या रचनांचा प्रचार होताच. अशा स्थितींत नवीनच प्रचारांत आलेल्या खडी बोलींत लिहिलेल्या कवितांसंबंधाने मजसारख्या लोकांना फारसें प्रेम वाटत नसे; आणि आमच्या पहिल्या भेटींत त्यांचीच जर कांही आम्ही थट्टा केली असेल तर त्यांत विशेष आश्चर्य करण्यासारखें कांही नव्हतें.

मैथिलीशरणजींचा आणि माझा अतिशय घनिष्ठ संबंध आला आणि त्यांच्याविषयी कांही सांगण्याचें साहस मीं केलेंच पाहिजे अशी मात्र स्थिति नाही. परन्तु त्यांना समजून घेण्याची मात्र मला पुरेशी संधि मिळाली आहे आणि ती तशी प्राप्त करून दिल्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहें. पत्रें लिहिण्याची संवय मला लहानपणापासूनच होती आणि माझा व मैथिलीशरणांचा पत्रव्यवहारहि बराच होई; मात्र गहन, गूढ अथवा साहित्यिक विषयांवर लिहिण्याची माझी कधीच योग्यता नव्हती, व तशी संधीहि मला कधी मिळाली नाही. सामान्यपणें कौटुंबिक आणि सामाजिक विषयांसंबंधीच आम्ही एकमेकांना लिहीत असूं. मैथिली-शरणजी पत्रांचीं उत्तरें अगदी न चुकतां देतात; आणि तींहि पुन्हा स्वतः लिहून. त्यांचें अक्षर स्पष्ट आणि सुन्दर आहे. बहुधा ते पोस्ट-कार्डांवरच लिहितात. आपल्या पत्रांत संस्कृत श्लोक उद्धृत करण्याचीहि त्यांना पुष्कळ हौस आहे. त्यांना कितीतरी श्लोक तोंडपाठ आहेत. त्यांच्या हिंदी कवितेची बैठक यामुळेच अतिशय सुंदर आहे आणि त्यांच्या कवितांचे विषयहि साहजिकच आपल्या परंपरेंतील वीर पुरुषांशीं आणि वीरांगनाशीं संबंधित आहेत; आणि म्हणूनच त्यांची कविता लोकप्रिय, आकर्षक आणि बोधप्रद उतरली आहे. साधारणपणें मी जेव्हा कविता वाचतों—मग ती संस्कृत वा इंग्रजी कोणतीहि असो—ती मला सहजच पाठ होते. व्रजभाषेंतील कितीतरी कविता मला पाठ येतात; परंतु काय असेल तें असो, खडी बोलींतल्या कविता मात्र मी मुखोद्गत करूं शकलों नाही, याचें मला वाईट वाटतें; परंतु माझा नाइलाजच होतो. कवितेचें असें वैशिष्ट्य मानलें जातें की एकदोनदा वाचल्यावर ती पाठ व्हावी. परंतु मला याचें फार दुःख होतें आणि लज्जाहि वाटते की आपल्याच भाषेंतील कविता, मी त्यांच्या नव्या रूपांत प्रयत्न करूनहि पाठ करूं शकत नाही.

श्री मैथिलीशरण गुप्तजींचें अध्ययन मला त्यांच्या पांच वेगवेगळ्या रूपांत करावेंसें वाटतें; व आणखीहि त्यांचें एखादें रूप असेल तर इतर मित्र त्यासंबंधी अवश्य कांही सांगतीलच. जग त्यांना कवीच्याच रूपांत विशेष प्रकारें ओळखतें. मींहि त्यांना पहिल्याप्रथम कवीच्याच रूपांत जाणलें. मैथिलीशरणजी हे केवळ कवि नाहीत; कवितेच्या नव्या प्रकारांचेहि ते प्रवर्तक आहेत. आपल्या कवितेच्या द्वारा त्यांनी आपल्या मातृभाषेला पुष्ट आणि समृद्ध केलें आहे

आणि तिचा प्रसार करण्यामध्येहि ते अत्यंत सहायक झाले आहेत. ज्याप्रमाणे प्रेमचन्दजींनी हिन्दीचें गद्य सुरस बनविलें व आपल्या करुणरम्य कौटुंबिक आणि सामाजिक कथांच्या द्वारें आमचें लक्ष आमच्या वास्तव जीवनाकडे आकर्षित करून घेऊन त्यामध्ये सुधारणा घडवून आणण्यास आम्हांला प्रवृत्त करण्याचा त्यांनी प्रयत्न केला, त्याचप्रमाणे पद्यद्वारा मैथिली-शरणजींनी हिन्दीची अतुलनीय सेवा केली आहे; आणि त्याचबरोबर आमच्या प्राचीन इतिहास-गाथांचेंहि आम्हांला स्मरण करून देऊन, त्यांना सुरस बनविलें. परंतु खरें सांगावयाचें तर त्यांच्या साहित्यसेवेबद्दल आणि त्यांच्या रचनांच्या संबंधांत कांही लिहिण्याचें धाडस मी माझ्या अनभिज्ञतेमुळे करूं शकत नाहीं.

हां, हें मात्र अवश्य सांगेन की स्वर्गीय पंडित महावीरप्रसाद द्विवेदींप्रमाणें हेहि दुसऱ्यांना हिन्दीकडे आकर्षित करितात आणि हिन्दींत लिहिण्याविषयी प्रोत्साहन देतात. मी मधून मधून कांहीं लिहीत आलों आहें. श्री शिवप्रसाद गुप्तजींनी सुरू केलेल्या 'आज' च्या सम्पादक-पदा-मुळे मलाहि हिन्दी लिहिण्याचा सराव झाला; त्याची गोडीहि लागली. नागरिक कर्तव्यें आणि अधिकार यासंबंधी मला नेहमींच एक प्रकारचें आकर्षण वाटत आलें आहे. आपल्या देशांत यासंबंधी उदासीनता पाहून मला दुःख होई. यामुळे पुष्कळ छोटे छोटे लेख मी दररोजच्या घटनांना धरून लिहीत असे. पुढे ते लेख मीं संगृहीत केले. मैथिलीशरणजींनींहि ते पाहिले आणि माझ्या प्रार्थनेचा स्वीकार करून त्यांतील सारे भाव त्यांनी पद्यांत आणिले. संग्रहामध्ये हें पद्यहि बरोबरच छापण्यांत आलेलें आहे. पुढे त्यांनी आपल्या 'हिन्दी साहित्य-सदन' द्वारा त्याच्या आणखीहि आवृत्त्या काढल्या. यामुळे मला हें समजून आलें की, नागरिक कर्तव्यांचा अभाव यांनाहि खटकत आहे; व त्यांच्या समर्थनामुळे मलाहि अधिक बळ प्राप्त झालें. माझीं आणखीहि कांही छोटीं छोटीं पुस्तकें प्रकाशित करून त्यांनी मला प्रोत्साहन दिलें.

मी त्यांना देशभक्त या नात्यानेहि जाणतों. प्रायः साहित्यिक हे आपल्या साहित्यिक कृतींच्या द्वारा देशाची व समाजाची सेवा करीत असतात. हे लोक कोणत्याहि चळवळींत सक्रिय भाग घेतांना दिसत नाहीत. ज्यांनी राजनीतिक लढ्यांमध्ये भाग घेतला असे साहित्यिक एकंदर जगतांत फार थोडेच पाहावयास सापडतात. ज्या लेखकांनी आपल्या देशांत क्रांति घडवून आणली ते लेखकहि फक्त आपली लेखणी चालवून आपल्या घरींच सुरक्षितपणें राहणें पसंत करीत आलेले दिसतात. परंतु मैथिलीशरणजींनी स्वातंत्र्याच्या लढ्यांतहि सक्रिय भाग घेतला व कारावासहि पत्करला. परंतु त्याचें कांहीहि दुःख त्यांनी मानलें नाही आणि तेथील कठोर कष्टहि त्यांनी मनांत ठेवले नाहीत. त्यांचें साहस आणि धैर्यहि वाखाणण्यासारखें आहे. 'भारत छोडो' च्या भीषण आन्दोलनांत कितीतरी लोक भूमिगत राहून काम करीत होते. त्या वेळीं यांच्यापैकी कित्येकांना त्यांनी आश्रय दिला. त्या वेळीं असें करण्यामध्ये खूपच धोका होता. परंतु त्याची चिंता यांनी कधीच केली नाही. ही यांची विशेषता आपण कधीहि विसरूं शकत नाही; आणि खरोखर यांच्या कवितांची आपण प्रशंसा करतों, तर यांच्या देशभक्तीचीहि प्रशंसा करणें तितकेंच अवश्य आहे असें मला वाटतें.

असे कितीतरी लोक आढळतात की, ज्यांना साहित्यामध्ये कांहीच रस वाटत नसतो, आणि याचमुळे देशांतील साहित्यिक आणि त्यांनी केलेली साहित्य-सेवा यासंबंधी ते उदासीन असलेले दिसतात. त्याचप्रमाणे असेहि पुष्कळ लोक सापडतात की ज्यांना देशाच्या राजकीय स्वातंत्र्यासंबंधीहि कांही आकर्षण नसतें, व स्वराज्य आणि परराज्य यांमध्ये कांही भौतिक आणि आध्यात्मिक अंतर असल्याचेंहि त्यांना कळत नाही. परंतु असे लोकहि मैथिलीशरणजींना

एक मित्र म्हणून ओळखीत आले आहेत; त्यांच्यावर प्रेम करीत आले आहेत आणि त्यांच्याहि प्रेमाला पात्र झालेले आहेत. मित्र या नात्यानेहि मैथिलीशरणजींचा योग्य तो आदर आणि सन्मान होणें अवश्य आहे. त्यांची मैत्री अत्यंत घनिष्ठ आणि चिरकालिक स्वरूपाची असते; व कोणी एखादा एकदा त्यांचा मित्र झाला की आपला संबंध ते त्याच्याशीं कधीहि तुटूं देत नाहीत. त्याच्या व्यक्तिगत आणि कौटुंबिक सुखदुःखांची विचारपूस ते करतात, आणि सहानुभूतिपूर्ण पत्रांनी, स्नेहद्योतक भेट-वस्तु पाठवून, किंवा निरनिराळ्या वेळीं स्वतः जातीने जाऊन व त्या त्या प्रसंगांत भाग घेऊन आपल्या खऱ्या मैत्रीची प्रतीति आणून देतात. त्यांचा पाहुणचारसुद्धा प्रशंसनीय असतो. त्यांच्या घरांतून कोणी विमुख जात नाही; आणि त्यांच्या घरीं कोणी कितीहि दिवस राहिला तरी तो यजमानास भाररूप होत आहे याची जाणीव त्याला कधीच करून दिली जात नाही. हे सदा प्रसन्नवदन असतात व दुसऱ्यांनाहि प्रसन्न राखीत असतात. हीसुद्धा कांही लहानसहान गोष्ट नव्हे. अत्यंत निकटचे मित्रहि पाहुण्यांचें आतिथ्य थोडें हात राखूनच करतांना दिसतात. सर्व प्रकारचा स्नेह दाखविणारेहि या बाबतींत एकदम साशंक होतांना दिसतात; व आपली यांतून कशी सुटका होईल म्हणून काळजी करूं लागतात. परंतु यांच्यासंबंधांत मात्र पुरातन नीतिवचनाच्या आधारें हें निश्चित सांगतां येईल की,

उत्सवे व्यसने युद्धे दुर्भिक्षे राष्ट्रविप्लवे ।
राजद्वारे श्मशाने च यस्तिष्ठति स बांधवः ।।

यांच्यासंबंधी किती आदरभाव त्यांच्या सर्व मित्रांच्या आणि सहकाऱ्यांच्या मनामध्ये आहे याचें एक छोटेसें उदाहरण मी देतों. ज्या वेळीं नव्या व्यवस्थापिका-समिति नेमल्या जात होत्या आणि काँग्रेसच्या वतीने भिन्न भिन्न विभागांतील जागांसाठी उमेदवार उभे करण्याच्या योजना आखल्या जात होत्या, त्या वेळीं राज्यसभेसाठी राष्ट्रपतींकडून नेमल्या जाणाऱ्यांच्या नांवांची शोधाशोध चालली होती. अशा प्रसंगीं एके दिवशी मी राष्ट्रपति श्री राजेन्द्रप्रसादजींजवळ बोललों की, राज्यसभेसाठी जेव्हा अशा नांवांचा विचार करण्यांत येईल त्या वेळीं मैथिलीशरणजींना त्यामध्ये अवश्य स्थान देण्यांत यावें. त्या वेळीं ते एकदम प्रफुल्लित होऊन उद्गारले, "तुम्ही फार चांगलें नांव सुचविलें; फार चांगलें नांव सुचविलें. त्यांची मी अवश्य नेमणूक करीन." त्यानंतर पुढे त्यांनी मैथिलीशरणजींना "पद्मभूषण" पदवी देऊनहि अलंकृत केलें. यामुळे आम्हां सर्वांना फार आनंद झाला.

मला अशी एक सवय आहे की, जेव्हा मी एखाद्या व्यक्तीच्यासंबंधी विचार करतों अथवा त्या व्यक्तीच्या जीवनाचा अभ्यास करतों, तेव्हा मी त्या व्यक्तीचें भोजन आणि गृहस्थजीवन यांवर प्रथम दृष्टि टाकूं इच्छितों. चरित्र-लेखक या गोष्टींची उपेक्षा करतांना दिसतात; परंतु माझ्या दृष्टीने वरील विचार अत्यंत आवश्यक असा आहे. अन्य मित्रांप्रमाणेच मैथिलीशरणजींचा पाहुणा होण्याचें भाग्य मलाहि लाभलें आहे. त्यांचा परिवार फार मोठा असून एकत्र कुटुंबांत ते राहतात. अनेक भाऊ तेथे आपल्या मुलांबाळांसह एकत्र राहतांना दिसतात. साधारण मध्यम स्थितींतील गृहस्थांप्रमाणे, सारेजण एकेच ठिकाणीं दिवसरात्र उठतात, बसतात. मैथिलीशरणजी आपलें लेखनाचें कार्य कुठे व कसें करतात हें मला माहीत नाही. मीं पाहिलें आहे की त्यांना गप्पागोष्टी करीत बसण्याचाहि खूप नाद आहे; हास्यविनोदांत त्यांना भरपूर रस वाटतो. त्यांच्या कुटुंबांतील लोक एकमेकांशीं मोठ्या प्रेमाने वागतांना दिसतात. पाहुण्याला आपणांपेक्षा परका वाटण्यासारखी परिस्थितीच निर्माण होऊं देत नाहीत. जेथे हिंदु कुटुंबें चारी

बाजूंनी मोडत आहेत, कोसळत आहेत, व्यक्तिवादी विचारसरणीने जेथे लोकांचें एकत्र राहणें अशक्यच बनवून टाकलें आहे, तेथे यांचें कुटुंब आदर्शरूपाने आज चिरगाँवामध्ये वसत आहे ही खरोखर प्रशंसा करण्यासारखी गोष्ट आहे.

संतोषाची गोष्ट अशी आहे की, भोजनाच्या बाबतींत मैथिलीशरणजींचा अमुकच आग्रह नाही. पुष्कळ लोकांचा, भोजनाच्या पदार्थांच्या बाबतींत व्यर्थ 'हें हवें, तें नको' असा चोखंदळपणा असतो; आणि त्यामुळे अशांचें आतिथ्य करणाऱ्या यजमानाला मोठ्या कठीण परिस्थितीशीं सामना द्यावा लागतो. मैथिलीशरणजी आपल्या नगरींत अतिशय लोकप्रिय आहेत; आणि विवाह-प्रसंगीं एकदा तेथे प्रत्यक्ष हजर राहून मीं पाहिलें आहे की, शेकडो लोक यांच्या निमंत्रणाला मान देऊन मोठ्या प्रेमाने येतात, आणि कसलाहि तंटा-बखेडा न माजवितां तासन् तास भोजनासाठी तिष्ठत बसतात आणि आवडीने भोजन ग्रहण करून जातात. मैथिली-शरणजी पाण्याचा लोटा आपल्याबरोबर घेऊन जातात. विवाह-प्रसंगांत सुद्धा मैथिलीशरणजी आपला साधेपणा सोडीत नाहीत. कोणत्याहि प्रकारचा विशेष कपडा ते या प्रसंगींहि वापरीत नाहीत. नेहमीच ते मध्यवेष परिधान करीत आले आहेत. हल्ली मात्र सामान्य जनांप्रमाणे ते एक कुडतें, धोतर आणि गांधी टोपी वापरूं लागले आहेत. परंतु राजकीय चळवळींत पडेपर्यंत ते नेहमी एकच प्रकारचा वेष परिधान करीत असत; व आजहि त्यांच्या कित्येक मित्रांना त्यांचा लांब बंददार अंगरखा आणि लाल विशाल पगडी आठवल्यावाचून राहत नाही. माझ्या दृष्टीने त्यांचें व्यक्तिगत आणि कौटुंबिक जीवन निश्चितच आदर्श गृहस्थाचें असेंच आहे.

जे मैथिलीशरणजींना जाणतात त्यांना हेंहि समजून चुकलें असेल की, मैथिलीशरणजी हे एक मोठे कार्यकुशल आणि व्यवहारकुशल पुरुष आहेत. हीहि एक आश्चर्याची गोष्ट आहे, परंतु तीहि एक त्यांची विशेषताच समजण्यांत येते. साधारणपणें साहित्यिक आणि त्यांत पुन्हा कवि हे व्यवहारकुशल क्वचितच आढळतात. त्यांचा सर्व कारभार अस्ताव्यस्तपणाचाच असावयाचा. परंतु मैथिलीशरणजींच्या बाबतींत हें खरें नाही. त्यांच्या घरांतील सर्व वस्तु यथास्थान असलेल्या दिसतील. स्वच्छता आणि व्यवस्थितपणा यांवर यांचें विशेष लक्ष असतें; आणि 'साहित्य-सदना'ची रचना ज्या सौंदर्यपूर्ण पद्धतीने पार पाडण्यांत आलेली आहे, तीहि एक प्रसंसनीय गोष्ट आहे. पुस्तकांच्या प्रकाशनाच्या बाबतींत अत्यंत शुद्ध आणि स्पष्ट व्यवहार ठेवण्यासंबंधी येथे कटाक्षाने लक्ष पुरविलें जातें. त्यासंबंधी यत्किंचितहि बेपर्वाई येथे दाखविली जात नाही; आणि ज्या साहित्यिकांचा, लेखकांचा, पुस्तक-विक्रेत्यांचा 'सदना'शीं संबंध आहे ते सारे माझ्या म्हणण्याला पुष्टीच देतील. मला स्वतःलाहि या गोष्टीचा अनुभव आहे. माझ्या ज्या पुस्तकांचें प्रकाशन येथून झालेलें आहे त्यांच्या विक्रीपासून जो आर्थिक लाभ होत असतो, त्यामध्ये लेखकाचा जो कांही हिस्सा असतो त्याचा सर्व हिशेब करून वर्षांतून एकदा तो मजकडे पोचविला जात असतो. अशा वेळीं माझी मोठी कठीण अवस्था होते. परंतु जें कांही असतें तें घ्यावेंच लागतें. मी त्यांचें यंत्रालय—छापखानाहि—पाहिला आहे. त्यांच्या कार्यालयाचीहि बारकाईने पाहणी केली आहे. यंत्रालयें आणि कार्यालयें याच्याशीं माझा आतापर्यंत खूप संबंध आलेला आहे आणि या संबंधांत जी सुव्यवस्था येथे दिसून आली, त्यासाठी मी मैथिलीशरणजींचेंच अभिनंदन करूं इच्छितों. आपल्याकडे एकंदरींत कार्यकुशलतेची बरीच वाण आहे. आमच्यापैकी बरेच जण याला व्यर्थ अवडंबर समजणारे आहेत. परंतु खरें पाहतां याच गोष्टींच्या अभावीं आम्ही आपल्या कामामध्ये यशस्वी होऊं शकत नाही. भगवान् श्रीकृष्णाने स्वतः गीतेंत सांगून ठेवलें आहे—योगः कर्मसु

कौशलम् । मैथिलीशरणजी या आदेशाचें आणि उपदेशाचें अत्यंत सुंदर अनुसरण करतांना दिसतात.

कवीच्या रूपांत, देशभक्ताच्या रूपांत, मित्राच्या रूपांत, गृहस्थ म्हणून, व्यवहारकुशल पुरुष म्हणून मीं यांना पाहिलें आहे. या सर्व रूपांत ते मला अनुकरणीय वाटले आहेत. मी स्वतःला खरोखरच भाग्यशाली समजतों की, मी यांना इतक्या दिवसांपासून जाणत आहें; आणि जरी मी यांच्या अधिक जवळ जाऊं शकलों नाही तरीहि यांच्या जीवनाचे अनेक पैलू पाहण्याचा आणि ते समजून घेण्याचा मीं प्रयत्न केला आहे. माझ्यासंबंधी त्यांचें जें मत आहे तें त्यांनी एका वाक्यांत सांगितलें आहे— "तुमची जिव्हा अत्यंत कटु आहे परंतु लेखणी तुमची मोठी गोड आहे. संभाषणांत वार करतां परंतु पत्रें फार सुंदर लिहितां." मला असें वाटतें की कदाचित् या लेखांत मीं त्यांचें म्हणणें यथार्थ ठरविलें असावें. जर ते मला भेटतील तर कदाचित् मी पुन्हा आपल्या जिव्हेने त्यांची थट्टा उडवीन आणि संभाषणांत घाव करीन. परंतु ज्या अर्थी मला त्यांच्यासंबंधाने लिहिण्याचा आदेश देण्यांत आलेला आहे त्या अर्थी मीं शक्य तर चांगल्या चांगल्या गोष्टीच लिहिण्याचा यत्न केला आहे. अर्थात् यामध्ये एकहि गोष्ट खोटीहि नाही व कुठे अतिशयोक्तीहि केलेली नाही.

काशीमध्ये यांच्या पन्नासाव्या व साठाव्या वाढदिवसाच्या निमित्ताने आयोजित केलेल्या सभांमध्ये भाग घेण्याची संधि मला प्राप्त झाली होती. आज जेव्हा आपण त्यांचा सत्तरावा वाढदिवस साजरा करीत आहों, तेव्हा या लेखाच्या द्वारा त्यांना आदरांजलि अर्पण करण्याची मला सुसंधि मिळत आहे हें मी माझें भाग्य समजतों. या निमित्ताने मी अशी शुभ कामना व्यक्त करतों की, त्यांनी अजून पुष्कळ दिवस आपल्यांत विराजमान राहून, आपल्या व्यक्तिगत आणि कौटुंबिक जीवनाच्या द्वारा आमच्यासमोर उच्च आदर्श प्रस्थापित करावा, आणि आपल्या साहित्यिक आणि सार्वजनिक कार्याने देश, भाषा आणि समाज यांच्या उन्नतीस हातभार लावावा.

* * *

## रवींद्र जन्मशताब्दिनिमित्त प्रसिद्ध झालेलीं अलीकडचीं पुस्तकें—

### प्रौढांसाठी

१. कालेलकर काकासाहेब – रवींद्रवीणा ( गीतांचें मनन व भाषांतर )
२. खानोलकर गं. दे. – रवींद्रनाथ : जीवनकथा ( चरित्र )
३. गोगटे श्रीकान्त – रवींद्रकाव्यदर्शन ( काव्यचर्चा )
४. जोशी श्रीपाद – रवींद्रनाथ आणि महाराष्ट्र ( संपादन )
५. तळवलकर गोपीनाथ – शांतिनिकेतन ( चरित्र )
६. भागवत अ. के. – टागोर : साहित्य, कला, विचार ( संपादन )
७. वरेरकर मामा – एकविंशति ( कथा )
८. शास्त्री शं. वा. – चक्षुशल्य ( कादंबरी )
९. सुखठणकर वि. स. – रवींद्रदर्शन ( चरित्र )

### मुलांसाठी

१०. करंबेळकर अनंत – वंगदेशीचें फूल ( चरित्र )
११. गोगटे श्रीकान्त – गुरुदेव रवींद्रनाथ टागोर ( चरित्र )
१२. वकील व्यंकटेश – कथानिकेतन ( कथा )

( संकलन – म. श्री. दीक्षित )

पंडित शेटे

# भारतीय पुनरुत्थानाचे कवि श्री मैथिलीशरण गुप्त

युरोप आणि भारत यांच्या संबंध-संपर्कातून भारतांत एक वैचारिक आंदोलन निर्माण झालें. या वैचारिक चळवळींतून केवळ नवीन विचारच हिंदुस्थानांत आले असें नाही, तर भारतांतील अनेक जुन्या विचारप्रणाली देखील नावीन्याने उजळून निघाल्या. या वैचारिक आंदोलनाचे प्रवर्तक राजा राममोहन रॉय हे मानले जातात. उपनिषदांतील गूढ सत्यांवर त्यांची श्रद्धा होती. त्याचबरोबर इंग्रजींतून मिळणाऱ्या ज्ञानावर व प्राधान्याने भौतिक शास्त्रावरहि त्यांची श्रद्धा होती. राममोहन रॉय यांच्यानंतर परमहंस, टिळक, रानडे आदि जे थोर नेते या वैचारिक आंदोलनाने निर्माण केले, त्यांची देखील हीच दृढ श्रद्धा होती. उपनिषदें वगळलीं तर भारताला व्यक्तित्वच उरणार नाही; उलट जुन्या ज्ञानाला नवीन भौतिक शास्त्रांची जोड दिल्याखेरीज गत्यंतर नाही. एवंच, प्राचीन भारत व आधुनिक युरोप यांच्या संयोगांतून भारताचें व्यक्तिमत्त्व खराखुरा आकार घेईल, हें या आंदोलनांतून गवसलेलें सत्य होय.

युरोपांतील 'रिनॅसन्स' (प्रबोधना)शीं या आंदोलनाचें कांही अंशीं साम्य आहे. बुद्धिप्रामाण्य आणि प्रवृत्तिवाद यांचा उदय या आंदोलनांतून झाला. हिंदुधर्म हळूहळू पोथीनिष्ठ बनत चाललेला होता. या पोथीनिष्ठेंतून एक प्रकारची अगतिकता, 'बाबावाक्यं प्रमाणम्'ची वृत्ति हाडींमासीं खिळलेली होती. या वैचारिक आंदोलनांतून जें बुद्धिप्रामाण्य उदयाला आलें, त्यांतून आस्तिक्यबुद्धि आणि परंपरागत धर्म यांनाच आव्हान दिलें गेलें. यांतूनच इतिहास, आणि दैवी व्यक्तींच्या कार्याचें नवनव्या दृष्टिकोणांतून परीक्षण होऊं लागलें. हिंदुधर्माचें हें एक गमतीदार वैशिष्ट्य आहे की, तो जितका बदलतो तितकाच तो अधिक आपल्या मूळ स्वरूपाकडे झुकूं लागतो.

बुद्धिप्रामाण्याप्रमाणेच प्रवृत्तिवादाचा उदय ही या वैचारिक आंदोलनांतून निर्माण झालेली दुसरी अपरिहार्य घटना आहे. प्रवृत्तिवादाचा सर्वांत प्रबळ आविष्कार लोकमान्य टिळकांच्या 'गीतारहस्यां'त झालेला आहे. म्हणूनच असें म्हटलें जातें, की गीता एकदा श्रीकृष्णाच्या मुखांतून सांगितली गेली आणि दुसऱ्या वेळीं ती टिळकांच्याकडून 'उद्गीत' झाली.

प्रवृत्तिवादाचा एक अपरिहार्य परिणाम असा झाला की, माणूस चांगुलपणाचा ध्यास सोडून शक्तीची उपासना करूं लागला. यांतून सौंदर्यासक्तीचा जन्म झाला व नैतिकतेच्या, (पारमार्थिकतेच्या) जागीं हळूहळू सौंदर्योन्मुखता येऊं लागली. मध्यकालीन नीतिकल्पनेंत सौंदर्यभावनेबद्दल कांही प्रमाणांत जुगुप्सा होती. आनंद अग्राह्य मानला जात होता आणि जेथे सौंदर्य आहे तेथे पाप असलेंच पाहिजे अशी धारणा होती. पण प्रचलित नीतिकल्पना सौंदर्य आणि आनंद यांना निर्दोष व पवित्र मानते. बुद्धिप्रामाण्यामुळेच सौंदर्य व आनंद यांच्याकडे आपण निरोगी दृष्टीने पाहूं लागलों. ऐहिकाच्या, पार्थिवाच्या जयजयकारांतून संन्यासापेक्षा प्रपंचाला अधिक महत्त्व आलें व प्रपंचाला, संसाराला प्राधान्य मिळाल्यामुळे स्त्रीच्या महत्त्वाची

कक्षा विस्तारत गेली. थोडक्यांत, प्रवृत्तिवादाचा उदय, बुद्धिप्रामाण्य आणि स्त्रीस्वातंत्र्य हीं मूल्यें या आंदोलनांतून उदयाला आलीं. स्त्रीकडे पाहण्याच्या या उदार दृष्टिकोणांतून स्त्रीसौंदर्याच्या पूजेचा उदय झाला. रवीन्द्रांच्या काव्यांतील स्त्रीचें पूजन आणि छायावादी कवितेंतील स्त्री-सौंदर्याची प्रतिष्ठा हीं या प्रवृत्तीचीं उदाहरणें होत.

श्री मैथिलीशरण गुप्त यांच्या काव्यांत प्राचीन भारतीय परंपरेचा ओघ प्रबळपणें वाहतांना दिसतो, व दुरून पाहिल्यास ते भूतकालाचे प्रतिनिधि वाटतात. त्यामुळे उपरिनिर्दिष्ट नवीन मूल्यांचा परिणाम त्यांच्या कवितेवर काय झाला असेल याचा अभ्यास उपयुक्त होईल.

भारतांत या पुनरुत्थानाचा किंवा वैचारिक प्रबोधनाचा प्रारंभ बंगालमध्ये प्रथम झाला. हिंदी प्रान्तांत हें आंदोलन नंतर सुरू झालें. बंगालमध्ये या आंदोलनाचे प्रवर्तक राममोहन रॉय, केशवचंद्र सेन, रामकृष्ण परमहंस आणि स्वामी विवेकानंद हे होते; व म्हणून या आन्दोलनाचे कवि म्हणून रवीन्द्रांचा निर्देश करावा लागतो. हिंदीमधील या आन्दोलनाचे प्रवर्तक स्वामी दयानंद हे होत व या आन्दोलनाचे कवि श्री मैथिलीशरण गुप्त हे होत.

भारतेंदु व त्यांच्या समकालीन कवींच्या काव्यांतच या वैचारिक प्रबोधनाचे पडसाद उमटूं लागले होते, व वाचकांतहि एक नवीन अभिरुचि निर्माण होऊं लागली होती. देशभक्ति आदि नवीन विषयांना काव्यांत मिळालेलें स्थान, इंग्रजी व संस्कृत काव्यांचे अनुवाद व श्रीधर पाठक आणि जगमोहन सिंह यांनी केलेले नवनवे प्रयोग यांतून ही नवी अभिरुचि पुष्ट होऊं लागली. खरें सांगायचें तर ब्रजभाषेचा त्याग करून खडी बोलीला काव्याची भाषा म्हणून स्थान देण्याची प्रबळ इच्छा या नवीन अभिरुचींतून पैदा झाली. म्हणून मैथिलीशरण गुप्तांचा उदय होण्यापूर्वी या वैचारिक आन्दोलनाने पूर्वतयारी तयार करून ठेवली होती असें म्हणतां येईल. परन्तु या आन्दोलनाचा खराखुरा आविष्कार गुण व संख्या यांच्या दृष्टीने मैथिलीशरणांच्या काव्यांतच झालेला आढळतो.

संस्कृतीचें प्रत्येक आन्दोलन हळूहळू गतिमान् होतें. हें वैचारिक प्रबोधन देखील हळूहळू हिंदी भाषेंत मुरलें. त्याचा पहिला अभिजात आविष्कार गुप्तजींच्या ' साकेत 'मध्ये झालेला आहे.

## ' साकेत 'मध्ये पडलेलें नवयुगाचें प्रतिबिंब :

रामायण आणि महाभारत हीं दोन महाकाव्यें भारतीय साहित्याचें सर्वस्व म्हणून मानतां येतील. मात्र प्रत्येक युगधर्माच्या अनुषंगाने रामकथेची बैठक बदलत गेलेली दिसते. तुलसीदासांचा राम परमेश्वर आहे. भवभूतीचा राम व तुलसीदासांचा राम वाल्मीकीच्या रामाहून पूर्णतया भिन्न आहे. गेल्या शतकांत भारतांतील विचारांत जीं परिवर्तनें झालीं, त्यांच्यावर वैज्ञानिक दृष्टिकोण, बुद्धिप्रामाण्य व लोकशाही या मूल्यांची छाप पडलेली आहे. त्यामुळे रामकथेकडे पाहण्याच्या आपल्या दृष्टिकोणांत जें परिवर्तन झालें, त्याचा आविष्कार ' साकेत 'मध्ये झाल्याचें आढळतें.

वास्तविक राम ही मैथिलीशरण गुप्तांची आराध्यदेवता. देवस्वरूपांतच मैथिलीशरण गुप्तांनी त्याला आळवलें; पण पं. नंददुलारे वाजपेयींच्या शब्दांत सांगायचें झालें, तर ' तुलसी-रामायणां 'त रामाच्या रूपाने परमेश्वराच्या मानवतेचें चित्रण झालें आहे, तर ' साकेत 'मध्ये रामाच्या संदर्भांत मानवांतील ईश्वरी अंशाचें चित्रण झालें आहे. या बुद्धिवादी युगांत रामाला भजणाऱ्या या कवीने ' साकेत 'मध्ये रामाचें चित्रण अवतारी रूपांत फारसें न करतां, युगपुरुष

म्हणून केलें आहे. नवीन वैचारिक प्रबोधनांतून जन्मलेला एक विचार असा आहे की, प्रत्येक व्यक्ति निदान कांही अंशीं तरी ईश्वरी अवतार असते. म्हणून अवतार व युगपुरुष यांच्यांत निश्चितपणें साम्य आहे. गुप्तजींच्या राम-चित्रणामध्ये ही भावना अनुस्यूत आहे. राम परब्रह्म आहे या सत्यावर तुलसीदासांइतकाच मैथिलीशरणांचाहि विश्वास आहे; परन्तु या अवताराचें कार्य कोणतें, याची प्रेरणा गुप्तजी नवयुगांतील विचारांपासून घेतात.

मैं आर्योंका आदर्श बताने आया,
जन-सम्मुख धनको तुच्छ जताने आया।
सुख-शांति हेतु मैं क्रान्ति मचाने आया,
विश्वासी का विश्वास बचाने आया।
मैं आया उनके हेतु कि जो तापित है,
जो विवश, विकल, बलहीन, दीन शापित है।
भव में नववैभव व्याप्त कराने आया।
नर को ईश्वरता प्राप्त कराने आया।

त्यांचा राम हा धर्म पुढें असा सांगतो—

संदेश यहां मैं नहीं स्वर्ग का लाया,
इस भूतला को ही स्वर्ग बनाने आया।

भगवे कपडे चढवून संन्यासी बनणें हा आजचा धर्म नसून संन्याशांनी देखील मनुष्य-प्राण्याची सेवा करणें हा आजचा धर्म होय; आणि परमेश्वर आता फक्त साधु आणि ब्राह्मण यांचें रक्षण करण्यासाठी अवतार घेत नाही, तर 'विवश, विकल, बलहीन, दीन' लोकांच्या उद्धाराकरिता अवतार घेतो. 'नरको ईश्वरता प्राप्त कराने आया' हा या प्रबोधनाचा सर्वांत मोठा संदेश आहे.

या भावनेबरोबरच देशभक्तीच्या भावनेचाहि भारतांत उदय झाला. वरील अवतरणांत ही देशभक्तीची भावना स्वातंत्र्यलढ्याचे पडसाद आणि राम वैदिक संस्कृति आणि धर्माचा प्रचारक होता या विचाराचे पडसाद उमटलेले दिसतात. 'साकेत'मधील शत्रुघ्न म्हणतो —

वह प्रलोभन हो किसी के हेतु,
तो उचित है क्रान्तिका ही केतु
दूर हो ममता, विषमता,
मोह, आज मेरा धर्म राजद्रोह।

## गुप्तजींचा स्त्रीविषयक दृष्टिकोण :

परन्तु या वैचारिक प्रबोधनाचा सर्वांत महत्त्वाचा परिणाम गुप्तजींच्या स्त्रीविषयक दृष्टिकोणांत आढळून येतो. वैदिक धर्मापासून बुद्धापर्यन्त सर्वांनी स्त्रीवर मोठा अन्याय केलेला आहे. जीवनाचें अंतिम लक्ष्य मोक्ष आणि त्याचें साधन संन्यास असल्याचें या सर्वांनीच सांगितलें. भर तारुण्यांत संन्यास घेणाऱ्यांची परंपराच निर्माण झाली. या संन्याशांच्या स्त्रियांच्या दुःखाचा, अगतिकतेचा, उपेक्षेचा कुणींहि विचार केला नाहीं. ही स्त्री पतीची निंदाहि करूं शकत नव्हती. कारण तो जीवनाच्या सर्वोच्च ध्येयाच्या शोधार्थ संसार त्यागून

बाहेर पडलेला असे. पतीबरोबर स्त्री संन्यासिनी देखील होऊं शकत नसे. कारण ज्या संन्यासांत माया संन्यासाशीं संलग्न आहे तो संन्यास संन्यासच नव्हे. हळूहळू स्त्रीने स्वतःलाच दलित मानण्यास सुरुवात केली.

स्त्रीकडे पाहण्याच्या या दृष्टिकोणांत या वैचारिक प्रबोधनाने आमूलाग्र क्रांति घडविली. यांतून असें मूल्य निर्माण झालें की, स्त्री केवळ सहानुभूतीलाच पात्र नाही, तर तें पूजास्थान आहे. संन्यासाश्रमाऐवजी गृहस्थाश्रमाला महत्त्व आलें, व त्यांतून आपोआपच स्त्रीचें महत्त्व वाढत गेलें. तिला आदरणीय स्थान प्राप्त झालें. रीतिकालीन कवींनी स्त्रीला कामक्रीडेचें साधन मानलें होतें. त्यांच्याविरुद्ध मोठीच प्रतिक्रिया झाली. हळूहळू स्त्री सती, बलिदान करणारी व त्यागमयी अशा रूपांत रंगविली जाऊं लागली. पुढे पुरुषांनीच स्त्रीला अबला बनवलें असल्याचा सूर उमटला. यानंतर स्त्रीविषयक दृष्टिकोणच उदार बनला. छायावादाने दिलेली प्रेरणा अधिक महत्त्वाची होती. स्त्री पुरुषापेक्षाहि श्रेष्ठ आहे, प्रेरकशक्ति आहे, हें छायावादाने हिंदी कवितेला शिकविलें.

गुप्तजींचा स्त्रीविषयक दृष्टिकोण 'साकेत', 'यशोधरा', 'द्वापर' आणि 'विष्णुप्रिया' यामध्ये पुरेपूर अभिव्यक्त झालेला आहे. उर्मिला, यशोधरा आणि विष्णुप्रिया या तिन्ही स्त्रिया पुरुषांच्या वैराग्यप्रेमाच्या बळी आहेत. मोक्षमार्गांतील अडगळ समजून पतीने ज्यांचा त्याग केला व ज्यांचें वैवाहिक आयुष्य त्यामुळे वैराण झालें, अशा लक्षावधि भारतीय स्त्रियांचें त्या प्रतिनिधित्व करतात. यांपैकी फक्त उर्मिलेचा विरहकालच फक्त मर्यादित होता. बाकी दोघी आमरण वैधव्य भोगीत राहिल्या.

'यशोधरा' लिहिण्याची प्रेरणा कवीला 'साकेत' लिहितांनाच मिळाली. 'यशोधरे'च्या निमित्ताने कवीने स्त्रीविषयक प्रश्नांचें अनेक अंगांनी परीक्षण केलें. उर्मिलेचें चित्रण करीत असतांना कवीने स्त्रीच्या समस्या, पतीच्या वैराग्याशीं असलेलें त्यांचें नातें आणि नवयुगाच्या दृष्टिकोणांतून या प्रश्नाचें उत्तर यावर विचार करावयास कवीने प्रारंभ केला व त्याची परिणति 'यशोधरें'त झाली. वास्तविक उर्मिला, यशोधरा आणि विष्णुप्रिया या एकाच चिंतनशील मनाच्या उत्तरोत्तर प्रगल्भ होत गेलेल्या तीन अवस्था आहेत. मात्र उर्मिला व यशोधरा बंडखोर स्त्रिया आहेत. विष्णुप्रिया अत्यंत नम्र आहे.

या तिन्ही स्त्रियांच्या चित्रणांत कारुण्याचा प्रवाह वाहतांना दिसतो. ज्यांचे पति सर्वोच्च ध्येयसिद्धीसाठी विरागी बनले आहेत, अशा स्त्रियांच्या डोळ्यांतून झरणाऱ्या अश्रुधारांतून ही करुणा निर्माण झालेली आहे. विशेष म्हणजे नवयुगाच्या उदयापूर्वीच्या कुठल्याहि कवीने या करुणेला आपल्या काव्यांत स्थान दिलें नाही. अर्थात् हें शक्यहि नव्हतें. नवयुगाच्या उदयापूर्वी वैराग्य पुण्यच नाही, तर त्याचें एक अंग पापाने लडबडलें आहे; स्त्रीवर सक्तीचें वैधव्य तें लादतें हें कुणास ठाऊक होतें ? व नवयुगांत देखील अखिल भारतांत या कारुण्याचें विदग्ध चित्रण माझ्या माहितीप्रमाणे फक्त राष्ट्रकवि मैथिलीशरणांनीच केलें आहे.

उर्मिलेच्या चित्रणांत ही करुणा मूक आहे. उर्मिलेच्या मनांत कितीहि वादळें उठलेलीं असोत, ती फक्त लक्ष्मणाला एवढेंच म्हणते—

मैं बाँध न लूँगी तुम्हें, तजो भय भारी।

पण यशोधरेच्या चित्रणांत या कारुण्याला वाचा फुटलेली आहे. मोक्ष जर जीवनाचें सर्वोच्च ध्येय असेल, तर स्त्रीला मोक्षाचा अधिकार कां नसावा ? या विरहिणी स्त्रियांच्या मनांत

असाहि विचार येत असेल की, पति व पत्नी उभयतांना मिळून मोक्षसाधना कां करतां येऊं नये ? यशोधरेवर जी आपत्ति आलेली आहे, तिचा ती सर्वांशाने विचार करते—

मैं अबला, पर, वे तो विश्रुत वीर बली थे मेरे,
मैं इंद्रियासक्ति पर वे कब थे विषयों के मेरे ?
सिद्धिमार्ग की बाधा नारी, फिर उसकी क्या गति है ?

बुद्धाचें निर्वाण आणि यशोधरेचे अश्रु यांत कोणाचें मूल्य अधिक ? पुरुषांच्या कीर्तीच्या मागे स्त्रीचें बलिदान झालेलें असतें.

विनम्र अशी विष्णुप्रिया देखील विचारते—

अबला के भयसे भाग गये, वे उससे भी निर्बल निकले,
नारी निकले तो असती है, नर यती कहा कर चल निकले ।

संतांनी स्त्रीला मोक्षाच्या मार्गांतील अडगळ मानली व तिचा त्याग करावा असें सांगितलें; पण जर परमार्थसिद्धि साधण्याचें स्त्रीने ठरविलें, तर तिने कुणाचा त्याग करावा याचें उत्तर त्यांनी अध्याहृत ठेवलें. हें उत्तर अप्रिय आहे म्हणूनच स्त्रीच्या मनावर सतत संस्कार केला गेला की, परमार्थसिद्धि हें पुरुषाचेंच कार्य आहे.

या विचारांत नवयुगाने परिवर्तन घडविलें. गांधी व अरविंद या दोघांनीहि सांगितलें की, पति आणि पत्नी दोघेहि मिळून परमार्थ-साधना करूं शकतात.

राष्ट्रकवि मैथिलीशरणांना हें मत मान्य आहे की नाही हें कळत नाही. पण त्यांचें मत असें दिसतें की, बुद्ध आणि गौरांग या दोघांनीहि गृहत्याग करण्यापूर्वी पत्नीची अनुमति घ्यावयास हवी होती. गेल्या शंभर वर्षांत स्त्रीविषयक दृष्टिकोणांत जे बदल होत गेले, त्यांच्या तीन अवस्था कल्पितां येतील. प्रथम स्त्रीबद्दल सहानुभूति निर्माण झाली, नंतर समानतेचा विचार उत्पन्न झाला व शेवटीं स्त्री बंडखोर बनून आपले हक्क मागूं लागली. गुप्तजींचें भाव-विश्व पहिल्या दोन अवस्थांपर्यन्तच मर्यादित झालेलें आहे. त्यांनी स्त्रीविषयी सहानुभूति निर्माण करून पुरुषांमध्ये अशी प्रेरणा निर्माण केली की, आपण स्वतः स्त्रीचे अधिकार तिला देऊन टाकावे. हा गांधींचा मार्ग आहे. त्यांच्या स्त्रिया कांही बोलत नाहीत; परन्तु त्यांच्या करुण व सजीव प्रतिमा पुरुषांच्या कठोरपणाला छेद देतात.

अबला जीवन हाय, तुम्हारी यही कहानी,
आँचल में है दूध और आँखों में पानी—

या दोन ओळींत या कारुण्याचा संपृक्त आविष्कार आढळतो.

मैथिलीशरणांचें अर्जित विशाल आहे. त्यांपैकीं थोड्याशा पैलूंवरच येथे प्रकाश टाकला आहे.

* * *

---

श्री. रामधारी सिंह ‘ दिनकर ’ यांच्या ‘ भारतीय पुनरुत्थानिक कवि श्री मैथिलीशरण गुप्त ’ या लेखाचा संक्षिप्त अनुवाद.

वसंत स. जोशी

# मराठींतील समानार्थक जोडशब्द

भाषेंत होत जाणारा बदल हें तिच्या जिवंतपणाचें एक लक्षण समजलें जातें. नवीन कल्पनांना नवें शब्दरूप प्राप्त होतें. जुन्या कल्पनांनाहि नवा आकार प्राप्त होतो. पूर्वी रूढ झालेल्या शब्दामागील कल्पना नव्या काळांत स्पष्ट होण्याकरिता दुसरा प्रचलित शब्द त्याच्याच जोडीला बसविला जातो. अशीं शब्दांचीं जुळीं नेहमी आढळतात. संस्कृतापासून किंवा प्राकृतापासूनहि अनेक पोटभाषा निर्माण झाल्या आणि त्यांनी आपला शब्दप्रपंच थाटला; परंतु पूर्वप्राप्त कल्पना त्यांना सोडतां आल्या नाहीत. पूर्वीच्या शब्दासोबत त्याचें नवें रूप देऊन जोडशब्द ठेवणें त्यांना आवश्यक झालें. अशा तऱ्हेने भाषेमध्ये समानार्थक जोडशब्द निर्माण होण्यास सुरुवात झाली.[1]

भाषेच्या शब्दरूपांत पडत जाणारा हा फरक अनेक कारणांनी निर्माण होतो. संस्कृत व प्राकृत भाषांचा प्रसार सगळीकडे होत असतांना त्या भाषा बोलणाऱ्यांच्या ठिकठिकाणीं वसाहती निर्माण झाल्या. द्राविडी भाषांनी वेढलेल्या प्रदेशांत त्यांचीं जणू बेटें निर्माण झालीं

१. डॉ. शं. गो. तुळपुळे यालाच 'सामासिक जोडशब्द' असें नांव देतात. यासंबंधी ते म्हणतात, 'यादव-मराठींत द्राविडी भाषांतून बरेच शब्द शिरले. क्वचित् अशा परकीय शब्दाने अर्थव्यक्तीचें कार्य नीटसें होत नसावें. एतावता, त्याच अर्थाचा एक तत्सम वा तद्भव म्हणजे आर्य शब्द जोडून अर्थ सुस्पष्ट केला जाई. एक स्वकीय व दुसरा परकीय अशा दोन शब्दांची जोड होऊन हा समास बने...वर्गीकरणाच्या दृष्टीने भिन्न परंतु अर्थाने अभिन्न असे शब्दांचे जोड यादव-मराठी बनविते.'

— या. का. म. भाषा : पृष्ठ २८२.

सुप्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ डॉ. सुनीतिकुमार चटर्जी अशा शब्दांना Translation compounds म्हणतात. यासंबंधी ते आपल्या—Polyglottism in Indo-Aryan या लेखांत म्हणतात,

'A word when once adopted becomes quickly naturalised if it really fills a want. The presence of speakers of two languages side by side leading to mutual influence gradually familiarises one with some special vocables of the other. In the initial stages of this sort of inter-influence among different speeches, it happens that a slight explanation becomes necessary to familiarise one group of people with the vocables obtained from a different group, each using its own speech. A new word is coming to the fore, a new word from a foreign language which the native speaker would not usually fully understand; a qualifying word, a sort of translation more or less exact, from the native speech, would be used to make the implication of the foreign word clear. This sort of what may be called 'Translation compounds' are found in all languages which came in living touch with another speech and were influenced by it' (pp. 178, 179.)

आणि मग साहजिकच एकमेकांच्या वस्तूंची, विचारांची, कल्पनांची देवाणघेवाण होऊं लागली. अशा वेळीं भाषेमध्ये जोडशब्द निर्माण झाले असल्यास नवल नाही. परकीयांच्या स्वाऱ्यांमुळेहि परकीय संस्कृतीशीं आपला संबंध आला आणि अपरिहार्यपणें त्यांच्या भाषांशींहि आपला संबंध जडला. राज्यकारभाराची भाषा वापरणें हा एक प्रतिष्ठेचा आणि उपजीविकेचा भाग मानला गेल्यामुळे जेत्यांची भाषा वापरण्याकडे जितांचा कल वाढत गेला. यामुळे ' गरीबबिचारा ' असा अरबी जोडशब्द आपण वापरूं लागलों. इंग्रजी अमलानंतर ' स्लेटपाटी ', ' कोर्टदरबार ' यांसारखे प्रयोग होऊं लागले. परकीयांच्या संपर्कापेक्षाहि शेजारीं शेजारीं असणाऱ्या भाषा-भगिनींचा संपर्क अशा ' समानार्थक जोडशब्दांना ' जन्म देण्यास साहाय्यकारी ठरतो. ' वैल-चूल ' असा शब्द वापरतांना ते दोन्ही एकाच अर्थाचे आहेत आणि ' वले ' हा कानडी शब्द आहे याची कल्पनाहि आपल्याला होत नाही. सर्वांच्या परिचयाचा ' खेळाडू ' हा शब्दहि असाच तयार झाला आहे. ' खेळ ' याच अर्थाचा ' आटु ' हा कानडी शब्द असून त्याचा हा जोडशब्द बनलेला आहे. ' चिल्लीपिल्ली ' या जोडशब्दांत ' चिल्ली ' या संस्कृतोद्भव शब्दाजवळच तामीळ ' पिल्लइ ' शब्द आपण ठेवलेला आहे.[२] ' बाजारहाट ' किंवा ' कागदपत्र ' हे शब्दहि अशाच प्रकारें तयार झालेल्या जोडशब्दांचे नमुने आहेत. मराठीशीं आलेल्या इतर भाषांच्या अशा संपर्काप्रमाणेच इतर प्रदेशांतहि मराठी शब्दांचें रूप समजण्याकरिता दुसरे शब्द वापरले जात असले पाहिजेत. विष्णुदास भाव्यांच्या ' अलल्डुर ' नाटकांतील पात्रें अभिनिवेशाने भाषण करीत असतांना जसे शब्द वापरतील, त्याच आवेशांत कानडी नाटकांतील एखादें पात्र ' नानु छप्पन्न ऐवत्तआरू देशगलन्नु नोडिद्देने ' ( मीं छप्पन्न ऐवत्तआरू देश पाहिले आहेत ) असें एखादें वाक्य सहजीं वापरतें. या ठिकाणीं ' छप्पन्न ' याच अर्थाचा ' ऐवत्तआरु ' हा कानडी शब्द वापरला गेला आहे.

अशा जोडशब्दांतून आपल्या संस्कृतीवर झालेला परभाषिकांचा परिणाम जसा कळतो, त्याचप्रमाणे सलग प्रदेशांतील लोकांच्या भाषेचा, त्यांच्या संस्कृतीचा आपल्या प्रदेशाशीं असलेला संबंधहि लक्षांत येतो. अशा शब्दांवरून कोणत्या भाषेचा दुसऱ्या भाषेवर आधिक पगडा होता हें निश्चित करणें सुलभ नाही. ' त्रयाणाम् महाराष्ट्रिकाणाम् ' या सूत्रावरून महाराष्ट्रियांच्याहि तीन वसाहती होत्या व त्यांचा भिन्न भाषिकांशीं संबंध येत होता, हें आपण समजूं शकतों. मराठी व कानडी भाषा बोलणारे लोक या ठिकाणीं होते. त्यांनी एकमेकांच्या भाषेंतील शब्दांचा उपयोग केला. देशी किंवा संस्कृतेतर भाषांत वाङ्मयनिर्मिति होऊं लागल्या-नंतर आपल्या संस्कृतीचें रक्षण करण्याच्या अभिनिवेशाने कांहींनी संस्कृताचा किंवा नाइलाजाने प्राकृताचा आश्रय घेतला. मराठी भाषा संस्कृताला जवळ असण्याचें हें एक कारण आहे. कित्येक जुने मराठी, किंवा ज्यांना आपण कानडी समजतों असे शब्द आपल्याला प्राकृता-पासून किंवा संस्कृतापासून व्युत्पादितां येतील. संस्कृत किंवा प्राकृत धातूंना कानडी किंवा मराठी प्रत्यय लागून वेगळे शब्द बनले. उच्चारांच्या दृष्टीने कानडीमधील ऱ्हस्व ए किंवा ऱ्हस्व ओ हे स्वर मराठींत नसल्याने कानडी समानार्थक शब्दांचें उच्चारण मराठींत वेगळें होतें. मराठींत आढळणाऱ्या जोडशब्दांचा विचार वरील अनुषंगाने केला तर त्यांची संगति लागूं शकेल.

---

२. संस्कृत–शाबाल > शावाल > चावाल > चील.
तामीळ–' पिल्लइ '.

एका भाषेंतून दुसऱ्या भाषेंत एखादी नवीन कल्पना प्रचारांत येत असतांना नव्या शब्दाबरोबरच दुसऱ्या भाषेंतील त्याच अर्थाचा, त्याचें स्पष्टीकरण करणारा दुसरा शब्द ठेवला जातो. हा अर्थाचें स्पष्टीकरण करणारा दुसरा परकीय शब्द सर्वार्थानें असें स्पष्टीकरण करूं शकेलच असें नाही. म्हणून एका शब्दाशेजारीं दुसरा तितकाच अन्वर्थक शब्द येईलच अशी अपेक्षा बाळगतां येत नाही. कांही वेळां व्यवहारांतून नष्ट होणाऱ्या व सहजीं अर्थ लक्षांत न येणाऱ्या शब्दांऐवजी त्याच अर्थाचा दुसरा शब्द ठेवण्यांत येतो. यामुळे जुना शब्द सुरक्षित ठेवला जातो किंवा त्याच्याशीं साहचर्य साधल्यामुळे नव्या शब्दाला सघनता प्राप्त होते.

जुन्या मराठी वाङ्मयाचें वाचन करीत असतांना असे एकाच अर्थाचे अनेक शब्द एकापुढे एक आलेले आढळतात.[3] अशा ठिकाणीं ग्रंथकर्ता व्यासपीठाची भाषा वापरूं लागलेला दिसतो. भाषेमध्ये आवेश येऊन ती वक्तृत्वपूर्ण होण्याकरिता अशा तऱ्हेने समानार्थक शब्दांची योजना केली जाते. या ठिकाणीं अर्थसुलभतेकडे, स्पष्टीकरणाकडे बुद्धिपुरस्सर लक्ष पुरविल्याचें दिसून येतें व त्याची जाणीव वाचकाला त्वरित होते. अर्थात् अशा शब्दयोजनेनें ग्रंथकर्त्याची संस्कृति, त्याची विद्वत्ता व ज्ञानांतील विविधता यांची कल्पना येते, हें खरें असलें तरी ज्या समानार्थक जोडशब्दांचा आपण विचार करतों आहोंत ते लोकजीवनांतून स्वाभाविकतेनें आलेले असतात. त्यांत एक प्रकारची अपरिहार्यता असते. लोकभाषेंत रूढ झालेल्या अशा समानार्थक जोडशब्दांचा वापर करीत असल्याची जाणीव वापरणाऱ्याला असत नाही, म्हणूनच भाषेंतील त्यांचें स्थान विचारार्ह असतें. या लेखांत अशा स्वाभाविक रीतीनें रूढ झालेल्या प्राचीन मराठी वाङ्मयांतील जोडशब्दांचा विचार करावयाचा आहे.

एखाद्या शब्दाच्या अर्थाचा बोध जेव्हा स्पष्टपणें होईनासा होतो, कांही कल्पना अस्पष्ट होऊं लागतात, अशा वेळीं त्याच अर्थाचा वेगळा शब्द अपरिहार्यपणें पुढे येतो. समानार्थक जोडशब्दांचा विचार करण्यापूर्वी तत्पूर्वीची भाषेंतील एक अवस्था आपल्याला लक्षांत घेतली पाहिजे. 'लीळाचरित्र' हा महानुभाव वाङ्मयांतील महत्त्वाचा ग्रंथ आहे. जीवनाच्या विविध थरांतील लोकांनी या आठवणी सांगितलेल्या असल्याने त्यांत भाषेचें वैविध्यहि साहजिकच आढळतें. या आठवणी महेंद्रभटांनी संकलित केल्या आणि नागदेवाचार्यांनी त्या घासूनपुसून घेतल्या. अनेकांचे पाठभेद दिले. असे पाठभेद देण्यांत कांही शब्दांचें स्पष्टीकरण करण्याकडेहि प्रवृत्ति दिसते. त्यांतील बारीकसारीक छटा सांगण्याकडे संकलनकाराचा कटाक्ष दिसतो. 'लीळाचरित्रां'तीलच कांही उदाहरणें पाहाः—

सर्वज्ञें म्हणीतलें : चांग पाहा : हीराइसा : चांग पाहा : नीकें पाहा : एकांक : पान ३१.

जोमाइसीं म्हणीतलें : जी जी : मज लांकाचें (एक प्रकारच्या डाळीचें) ढीडरें आवडे : तथा रूचे : परि साहे ना : भाग ४, पान २६.

---

३. उदाहरणार्थ : पेंधा वढजा वाकुडा : सुधामा वागा वागडा : ६८ वच्छहरण.
जैसे अमृत नव्हे जुने : उरंगे ना साडे पन्हर सोनें २९ वच्छ०
तो वरवा भला युक्तु : कायफा सासरदोतीचा मैत्रु ।। ७०–४६
खि. पु.
विलोकी सुबुद्धीचा मार्गू : ब्रह्मऋषीचा समुदाय संत्रू ।। ८४–९.
भुवप.

गोसावीयांपुढें सगडी असे : तथा अग्निष्टीका : भाग ४, पान ३१.
अवधुत भांगी भाजीति होते : तथा ब्रह्मप्रकाशीका[४] भाग ४, पान ३५.
गगनचुम्बीत तेजपुंजी देखीला : तथा प्रकाशु : भाग ४, पान ५७.
केशव विहीरि जेविती : बारवें जेविती : उत्तरार्ध, पान १२६.
भावघेया मढाआंतु प्रकाश पडिला : उजिएडु पडिला : उत्तरार्ध, पान १५६.
गोसावीं श्रीकरीं वांगेयाची फाळि घेतली : तथा फोडी : उत्तरार्ध, पान २७९.
जोगी मुंडिला नीका दिसे : तथा वरवा दीसे : उत्तरार्ध, पान १८३.

अशा ठिकाणीं शब्द पारखून घेण्यांत आले असले तरी त्यांतहि समानार्थक जोडशब्द बनण्याची शक्यता आहे किंवा त्यांचीं बीजें आहेत, असें म्हणतां येईल.

भाषेमध्ये रूढ झालेला एखादा शब्द कित्येक वर्षें, नव्हे कित्येक शतकें, आपलें आस्तित्व टिकवून ठेवतो. यांत कालमानानुसार अर्थप्रक्रिया आणि वर्णप्रक्रियाहि होत जाते. अशा प्रकारचे एक-दोन शब्द आपण तपासून पाहिले तर त्यांच्यामध्ये अंतर्बाह्य होत जाणाऱ्या बदलाचें मनोरंजक स्वरूप आपल्या ध्यानांत येऊं शकेल. उदाहरणार्थ, ‘मातु’ हा शब्द आपण घेऊं.

१ मातु :

येथ हरिहर ब्रह्मादिकांची । मातु कायेसि ॥ ६२-३ ॥[५]
ऐसें बोलोनिया मातु । सांडिली तेणें ॥ १-१२० ॥[६]
हडपी चवर धरू : भांडारी खाजे करू ।
गुपितिअे जुआळि कारू : मातु सांगिते ॥ ३५४ ॥[७]
देवांचेया रूपाची करित मातु : भीमकी सभे येती जाली ॥ १०७ ॥[८]
ते सांगो जाताती श्रवण । जैसे काने मातु ते ॥ २४० ॥[९]
सर्वज्ञें म्हणीतलें : इंद्रेया : नगरांतु काइ : मातुवार्ता :[१०]
दुजेयाचा संगी : पडे स्नेहाची वज्रांगी
गोष्टीमातु करी वाउगी : वेळु फेडावेया ॥ १८७० ॥[११]
तव द्विजु येक आला । रायाजवळि बैसला ॥
परस्परें बोलिला । गोष्टिमातु ॥ १०-अ. २२ ॥[१२]

प्राचीन मराठींतील असे कांही शब्द आपण घेतले व त्यांचा पुढील काळांतील वाङ्मयांत आपण मागोवा घेऊं लागलों, तर त्यांचा वापर कमी कमी होत गेलेला आढळतो. चक्रधरांनी इंद्रेयाला नगरांतील ‘मातुवार्ता’ विचारली, आपण आज ‘खबरबात’[१३] विचारतो. ‘मातु’ हा शब्द आजच्या प्रचलित मराठींत जवळजवळ नाहींच म्हटल्यास चालेल. काव्यांत मात्र तो क्वचित् व बदललेल्या स्वरूपांत आढळतो (‘काय सांगूं देवाची मात’—ग. दि. माडगूळकर).

---

४. भांगेला ‘ब्रह्मप्रकाशिका’ शब्द सुचविणाऱ्याच्या विनोदी बुद्धीचें कौतुक करावें तेवढें थोडें आहे !

५. श्रीमुवि. ६. श्रीज्ञा. ७. भाशिव. ८. नरुस्व. ९. वच्छ९, १०. लीच. भाग ४, पान ४६, ११. भाउगी. १२. सिंव्र. १३. खबर = अरबी – खबर्. बात = संस्कृत – वार्ता, प्राकृत — वत्ता, वट्टा, हिंदी — बात.

अशा तऱ्हेने या दुसऱ्या भाषेतील शब्दांचें क्रमाक्रमानें आपल्या भाषेंतून होत गेलेलें उच्चाटन लक्षांत घेतलें तर त्या भाषिकांशीं आपला संपर्क कमी झाला, त्यांचें वर्चस्व किंवा सासुरवास नाहीसा झाला आणि स्वभाषेंतील शब्द वापरण्याकडे लोक लक्ष पुरवूं लागले असें म्हणतां येईल. अर्थात् अशी स्थिति स्वराज्यप्राप्तीची व स्वाभिमानजागृतीची द्योतकच म्हणावी लागेल.

२. केळिक्रीडा :

सर्वज्ञें म्हणीतलें : श्रीप्रभुची केळिक्रीडा देखीली[१४]
केळिक्रीडा देखीलीया[१५]
श्रीप्रभुची केळिक्रीडा : कऱ्हणाइ जीवा क्षेणुपरियेंत अनुकरेना[१६]
गोसावीं वीनवणी स्वीकरीली ; मग घरोघरीं त्रीजें करीति :
खेळक्रीडा करीति : मग त्रीजें करीति :[१७]
[ खेळ : सं. – खेलयति, अप० खेळण > खेल्लइ ]

सुरवातीचा समानार्थक संस्कृत जोडशब्द आणि नंतरचें संस्कृतोद्भव स्वरूप लक्षांत घेण्यासारखें आहे.

३. बरवाश्रेष्ठ :

तव एका भक्तजनाचा बरवाश्रेष्ठ उपाहार आला[१८]
मग बाइसीं गोसावियालागौनि बरवाचोखट उपाहार निफजविला[१९]
बरवेश्रेष्ठ पदार्थ बाइसा हातीं दीधले[२०]

मग तींहि गोसावियांलागौनि बरवेउत्तम तांदुळ घेतले : उत्तम सकळ पदार्थ घेतले : उत्तमेंबरवीं पूजाद्रव्यें घेतलीं : मग बरवाउत्तम उपाहार नीफजवीला.[२१]

या ठिकाणीं जोडशब्द विशेषण असून त्याचें लिंगवचन विशेष्याप्रमाणें बदलल्याचें दिसून येतें.

तव मटोवासीं म्हणीतलें : कैसी बरवींचोखें पानें फुलें :[२२]
[ बरवा–सं. परम्. चोखट – सं. चौक्ष, चोक्ष, देप्रा. चोक्ख ].

प्राचीन मराठी वाङ्मयांत आढळणाऱ्या आणखी कांही जोडशब्दांचीं उदाहरणें पुढे देत आहे:—

४. जरु-तावो :

जव जीयाला तंव तयासि जरु-तावो नाही :[२३]
ज्वरुतापु लागले : खरुजा लागलीया[२४]
[ जर–सं. ज्वर, प्रा-जर. ताप–सं. तप्, तप्य, > तप्प > ताप. ]

१४, १५, १६. लीच. भाग ४, पान ५९.
१७. गोप्रच, पान १०६.
१८, १९, २०. लीच. उत्तरार्ध, पानें १२२, १२७, १५२.
२१. लीच. उत्तरार्ध, पान १२६.
२२. लीच. एकांक, पान ६४.
२३. गोप्रच, पान ४.
२४. गोप्रच, पान ३९.

अनुक्रमणिका

५. आश्चर्यविस्मो :

म्हणौनि आश्चर्यविस्मो जाला[२५]
मग आवघेया लोकांसि आश्चर्यविस्मो जाला[२६]
[ तंव कृष्णमनीं नावेक । विस्मो जाह्ला ॥ १–७ ॥
तेथे श्रीकृष्ण विस्मो पावला । ॥ २–८३ ॥–ज्ञानेश्वरी. ]

६. ताटथाळा :

तेचि थाळा-ताटीं आपण वैसलीं[२७]
ताटथाळा तांब्रीया घेउनि बाहीरि आणिले[२८]
[ थाळा–सं. स्थाल, प्रा. थाल. ताट–कान. तट्ट–सं. तत् √तन् <विस्तारे. ]

७. निशाणदुंदुभी : निशानभेरी :

निशाणदुंदुभी रणतुरे । तडका बुजालि खेचरें ।
यंत्रवाण येकसरें । गगनमार्गि उसळती ॥ १५–अ. ६ ॥[२९]
लागलिया निशानभेरी । श्रृंगें काह्राळा रणमोहरीं ।
दुंदुभिच्या माहास्वरीं । नाद अंवरीं न समाये ॥ ६६–अ. ५ ॥[३०]
ढवस पट हो भेरी । राअे गिडगिडिआ रणमोहरीं ।
निशानांचा गजरीं । आकाशु फुटे ॥ ५२६ ॥[31]
दिशाचक्र बहिरैले : घाई निशानाचा ॥ ५८५ ॥[32]
निशान पटहो भेरी : राअे गिडगिडिआं रणमोहरीं ॥ १०२७ ॥[33]

या ठिकाणीं ‘ निशाण ’ या शब्दाचा ‘ नगारा ’ हा अर्थ अभिप्रेत आहे. यासंबंधी प्रा. पां. ना. कुलकर्णी, ज्ञानेश्वरी अ० ९ च्या प्रस्तावनेंत लिहितात, ‘ निसाण ’ म्हणजे नगारा हें रणवाद्य युद्धसमयीं वाजविलें जाई. कांही संशोधक ‘ निसाण ’ हा शब्द फारसी ‘ निशान् ’ या शब्दापासून व्युत्पादितात, पण तें चुकीचें वाटतें. फारसी ‘ निशान् ’ चा अर्थ चिन्ह, खूण, झेंडा असा आहे. वाद्यवाचक नाही. संस्कृत ‘ निस्वन ’ किंवा ‘ निस्वान ’ या ‘ आवाज ’ या अर्थाच्या शब्दापासून प्रस्तुत शब्द प्राकृतद्वारा येणें शक्य आहे. रेव्ह. किटेलच्या कन्नड-इंग्लिश डिक्शनरीमध्ये भेरी, नगारा या अर्थानें निस्साण व निस्साळ असे दोन शब्द आढळतात. प्रस्तुत कोशांतच हाच शब्द मलयालम् भाषेंत ‘ निषाण ’ व तामिळ भाषेंत ‘ निजान ’ असा आढळतो असें म्हटलें आहे. कानडी भाषेंतील एक उदाहरण असें आहे. ‘ घां घां घळं त्रिक्किद कुडुहिन निस्साळ घोषक्के रायर केडदरे ’ ( ५८५ ) नागवर्म : कादंबरी पूर्वभाग ( इ. स. १०२४ ). अर्थ : “ निस्सालवर पडणाऱ्या टिपरीमुळे निर्माण झालेल्या ‘ घां घां घळं ’ या घोषानें ( शत्रु ) राजे गलितधैर्य झाले. ” प्रा. कृ. पां कुलकर्णी यांनी म. व्यु. कोशांत पुढील अर्थ दिला आहे : निशा ( सा ) ण = पुं. नगारा, डंका, Kettle-drum प्रा. निःसाण, याकाम–निशाण ( रणवाद्य, नगारा ).

---

२५. गोप्रच, पान १८. २६. गोप्रच, पान ८२.
२७. लीच. एकांक : पान ८. २८. गोप्रच, पांन २७.
२९. मुविप. ३०. मुविप. ३१. भाशिव.
३२. भाशिव. ३३. भाशिव.

८. मांदिमेळावा :

प्रमाणांचा वंबाळदिवा : न देखे वेदांचा मांदिमेळावा
आगमा नाही रीगावा : तुझ्या स्वरूपीं ॥ ५३६ ॥[३४]
जेथ अर्चीमार्गिचे खोल हाट : धर्ममार्गाची राजवाट
चंद्रसूर्यांचा चौबारा मांदी दाट : विसंवतेयाची ॥ ९६ ॥[३५]

[ मांदि–मंड्. मेळावा–सं. मेल > प्रा. मेलअ. ]

९. गडेथडी :

आपण भोगी समुद्राची गडेथोडी : पुन राय ओळगति सपन्न
कोडी : सुरवर तेतीस कोडी : चाळक जयाचे ॥ ३०२ ॥[३६]

'गडी' या कानडी शब्दाचा अर्थ तट, मर्यादा असाच आहे. हेच शब्द भास्करभट्टांच्या 'उद्धवगीतें'त वेगवेगळ्या स्थळीं पण एकाच अर्थाने येतात.

तया सन्निधानाची वेडी : जया नन्हेचि वरिपडी :
ते केवि पावति पैलथडी : संसारसागराची ॥ ५० ॥
तेन्हळि तयापुढे : मियां दिन्हली सातां दिवसांची गडे ॥ ६७ ॥
तो जुझारा गडे : पाई भार शांखळ काढे ॥ ३५९ ॥

[ गडा–स्त्री. मर्यादा; सीमा, Limit. कान० मर्यादा, परिसर. थडी–सं. तट > प्रा. थड. ]

१०. बारवविहिरी :

काचराळेयाचा मार्गी बारववीहीरि होती :[३७]
गावींचीं आंडोरें गोसावी बारवेंसि त्रीजें करीति :[३८]
केशव विहिरी जेविती : बारवें जेविती[३९]

[ विहीर–सं. विवर. बारव–वापीवरून हिं. बावडी > बाडवी > बाडव > बारव. ]

११. वस्त्रकापड :

भिक्षा कीजे : भिक्षा निकी : वस्त्रकापड होए जी :[४०]

[ वस्त्र–सं. कापड–सं. कर्पट > कप्पड > कापड. ]

१२. असत्यलटकें :

गोसावीं मार्कंडातें म्हणीतलें : एथ तुम्ही सदा असत्यलटकें बोला
मार्कंडीं म्हणीतलें : जी जी : मी गोसावीया काइसेया असत्यलटकें बोला[४१]

[ लटकें : सं. लट्ट = वाईट संवयीचा, लट्ट + क. ]

---

३४. माउगी. ३५. माउगी. ३६. नरुस्व.
३७. लीच. भाग ३, पान ११५. ३८. गोप्रच, पान ५३.
३९. लीच. उत्त. पान ४. ४०. लीच. भाग ४, पान १४.
४१. लीच. भाग ४, पान २३.

१३. मळघाणि :

· सर्वज्ञें म्हणीतलें : मळघाणि फेडिजे[४२]

[ मळ–सं. मल, प्रा. मलइ, मळइ, मलेइ. घाण–सं. घ्रा. प्रा. घाण. ]

१४. वेडेपिसे :

उठा उठा : वेडेपीसे यथ यक आणुनी घातले असेति : तींहि आगि लाविली.[४३]

नांव हेरोदी ते देखुनु । येशूचा पाडुन करुनु ।
वेडासैरा म्हणउनु । मानिलें मनीं ॥ ५६–४७ ॥[४४]

[ वेडे–सं. वेधेय > वेढेअ > वेढ > वेड. कान०–एडु, इडु = मूर्खपणा. पिसा – पिशाच, प्रा. पिसाय. सैरा – सं. स्वैर, प्रा. सैर. ]

१५. विदीवाटा :

पुणती पिलातापासी येती । विदीवाटा लोकु भेटती ॥ ६४–४७ ॥[४५]

[ विदी – सं. वृत्ति, वीथि, प्रा. वित्ती. वाटा – वैसं. वर्तिः > सं. वर्त्मन् > प्रा. वट्टा. ]

१६. श्रेष्ठआगळा :

पृथ्वीचीया भूमीपाळा । श्रेष्ठआगळा असति की ॥ ८३, अ. १ ॥[४६]

[ आगळा या शब्दाची सं. अग्र + ल (१) देप्रा. अग्गाला अशी व्युत्पत्ति देऊन प्रा. कृ. पां. कुलकर्णी म्हणतात, ' संस्कृत शब्द स्पष्ट असतांना हेमचंद्र देप्रा म्हणून कसा देतो हें समजत नाही. ' याच शब्दाची सं. अर्घ्य > अग्ग + अळ ( कान० ) = अग्गळ > आगळा अशी व्युत्पत्ति देतां येईल. ]

१७. जानुगुडघे :

तीक्ष्ण मारिति कोपर । ज्यानुगुडघे अतिकठोर ॥ ७, अ. २ ॥[४७]
दात खावोनि करकराटी । गुडघा स्थापिला हृदयपुटीं ॥ २४, अ. ७ ॥[४८]

[ गुडघा–सं. घोटक, सिं. गुड. अशी व्युत्पत्ति देतांना प्रा. कुलकर्णी यांनी शंका व्यक्त केली आहे. हा शब्द मूळ द्राविडी असून त्याचें संस्कृतीकरण नंतर झालें आहे. ]

१८. हृदयकाळीज :

हृदयकाळिजीं खडतरू । कंदर्पसर्प झोंबिनला ॥ १००, अ. ३ ॥[४९]

[ काळीज : सं. कालेय, प्रा. कलिजा, हिं. कलिजाह् ].

१९. ग्रामपाली :

ग्रामपाली खेटकयुक्त । आगरें वनें उपवनें ॥ ५०, अ. ७ ॥[५०]
संस्कृत आणि द्राविडी शब्दांचा जोडशब्द येथे बनला आहे.

---

४२. लीच. भाग ४, पान १५७. ४३. गोप्रच, पान ६.
४४. खिपू. ४५. खिपू. ४६. मुविप. ४७. मुविप
४८. मुविप. ४९. मुविप. ५०. मुवप.

२०. उडुाणेंकिराणें :

उडुाणेंकिराणें घेती गगनीं । कार्य साधिलें म्हणोनी ॥ १५७, अ. १५ ॥[५१]

[ उडुाणें–सं. उड्डयते, उड्डीयते, प्रा. उड्डेइ, उड्डाइ. किराण–सं. किल ].

२१. पाटपीढी :

घरिचिया सांकडीं : मायबापा बाहीरि हिंडी :

म्हणौनि नोवरीचि पाटपीढी : वैसो घाली ॥ ४७६ ॥[५२]

[पाट–सं. पीठ, पट्ट. प्रा. पाट. पीढी–सं. पीठम्, पीठक, प्रा. पीढ, पीढअ, पिढिआ.]

२२. दगडगुंडे :

आपुलिये दाढे : आपुलीचि जीभ रगडे

तरि कोपें दगडगुंडे : घेयावे कवणावरि ॥ ७३१ ॥[५३]

[ दगड–कान० दक्कड. गुंडे–कान० गुंडु. ]

२३. तरियातारुवें, नावाहोडी :

तेथ तरियातारुवें दोन्ही प्रव्हाणें :

नावाहोडी बेडिया जंगे विस्तीर्णें ॥ ७२० ॥[५४]

[ तरियातारुवें – सं. तरी. नावाहोडी – नावा – सं. नौ. होडी. कान० ओड्. ]

२४. वोलिसेले :

वोलिसेले वाणेलग : कुंकुम कस्तुरिएचे :[५५]

मृदुमराळांचा वोलिसेला :[५६]

[ सेला – शेला : सं. चेल, चैल.; वोलि – कान० ओलि = शेला. ]

२५. धामधवळारे :

ऐसी नगरमंडीते देउळे : देखे गोक्षीर धामधवळारे :[५७]

[ धाम – सं. धा, धामन्. धवळार – सं. धवल + अगार. ]

२६. वेळुउसिरू :

पुरे हो यासि घालि बाहिरी । मारि जडोनि कुसावरि ।

वायां वेळुउसिरू । लाविसी येथें ॥ १३६–४७ ॥[५८]

[ वेळु – सं. वेला. उसिरू – सं. उरसूर्यम्, प्रा. उच्छूर > उस्सूर > उशीर. ]

२७. पातळलुगडें :

कास्मिराचिये करंडिये जैसे : भीतरिल मूर्ति प्रकासे :

पातळालुगडेयांतुनि तैसे : आवएव दीसताती ॥ १३६–४७ ॥[५९]

मग ते पातळालुगड्याचीया भांडीं बांधले[६०]

---

५१. मुवप. ५२. भाउगी. ५३. भाउगी.
५४. नरुस्व. ५५. नरुस्व. ५६. भाशिव.
५७. ऋद्धि० ५८. खिपू. ५९. नरुस्व. ६०. गोप्रच, पान ६२,

कनककांतीचे काले : जेया वेळोवेळीं दीन्हले :
तिओ वेदिर्ली पातळें : सोनेसळी ॥ ३९२ ॥[61]

[ लुगडें–सं. रुग्ण ( दुबळें, अशक्त ), प्रा. रुग्ग, लुग्ग. पातळ या शब्दास अन्वर्थक अशीच ही व्युत्पत्ति आहे. सं. दुकूलम् > डुगूलम् > लुगुड. ]

२८. ओरपेदरोडे :

गावीं ओरपेदरोडे पडों लागले[62]
काइ वोरपेकार ( दरोडेखोर ) आले ?[63]

[ ओरप–जोराने ओढणें. सं. अव् + रफ् ].

२९. वढीलवृद्ध :

पुण्याहवाचनीं मंगळशब्द । नमस्कारिले वडिलवृद्ध ॥ ९–६७ ॥[64]

[ वडील–सं. वृद्ध, प्रा. वड्डिअ, देप्रा–वड्डिल. ]

मराठींतील समानार्थक जोडशब्दांचा दुर्लक्षिला गेलेला विचार या लेखांत मांडण्याचा मीं प्रयत्न केला आहे. हें वैशिष्ट्य कोणत्याहि एकाच कालखंडापुरतें मर्यादित असतें असें नाही, तें सातत्याने चालूच असतें. आजच्या काळांतहि आपण ठावठिकाणा, बळजबरी, खेडोपाडीं, अशा तऱ्हेचे शब्दप्रयोग करीत असतोंच. आपल्या ते अंगवळणीं पडून गेलेले आहेत, आणि हेंच तर या समानार्थक जोडशब्दांचें वैशिष्ट्य आहे. ते लोकजीवनांतून स्वाभाविकपणें कांहीं विशिष्ट अर्थाची गरज भागविण्याकरिता पुढे येत असतात. त्यासाठी भाषाशास्त्रज्ञांची गरज असत नाही. ते दोन्ही शब्द एकरूप होऊन अजाणतेपणें लोकजीवनांत वावरत असतात. भाषेची ही एक नैसर्गिक प्रवृत्ति आहे. कोणत्याहि भाषेच्या वर्धनामध्ये समानार्थक जोडशब्द हा एक महत्त्वाचा दुवा आहे, हें मान्य करावें लागेल.[65]

---

६१. भाशिव. ६२. गोप्रच, पान ३९.
६३. लीच. उत्त० पान ७०. ६४. मुसप.
६५. या लेखांत वापरलेले संक्षेपः—

१. श्रीमुवि – श्री मुकुंदराज : विवेकसिंधु.
२. श्रीज्ञा – श्री ज्ञानेश्वरी.
३. भाशिव – भास्करभट्ट : शिशुपालवध.
४. नरुस्व – नरेंद्र : रुक्मिणी-स्वयंवर.
५. वच्छ० – पंडित दामोदर : वच्छहरण.
६. लीच. – लीळाचरित्र.
७. भाउगी – भास्करभट्ट : उद्धवगीता.
८. सिंब. – सिंहासनबत्तिशी (हस्तलिखित).
९. गोप्रच – गोविंदप्रभुचरित्र.
१०. मुवप – मुक्तेश्वर : वनपर्व.
११. मुसप – मुक्तेश्वर : सभापर्व.
१२. मुविप – मुक्तेश्वर : विराटपर्व.
१३. खिपु – खिस्तीपुराण : फादर स्टीफन्स.
१४. ऋद्धि० – ऋद्धिपूरवर्णन : नारायण व्यास बहाळिये.

* * *

ना. गं. जोशी

# तेराव्या शतकांतील समान मराठी-गुजराती शब्द

प्राचीन ग्रंथांचा अन्वयार्थ लावतांना जी एक मुख्य गोष्ट नडते ती त्या काळच्या रूढ शब्दांच्या निश्चित अर्थाबद्दलच्या अज्ञानाची. प्रथम केवळ संदर्भावरून जुळेल असा सरासरी अर्थ काढणें एवढेंच शक्य होतें. महानुभावी ग्रंथ व 'ज्ञानेश्वरी' यांच्या अर्थनिश्चितीच्या वेळीं मराठीबरोबर पुरातन कानडी शब्दांचा विचारहि आता आपण करतों. अशाच तऱ्हेने त्या वेळीं चालू झालेल्या जुन्या राजस्थानी–गुजराती शब्दांचाहि विचार करून मग अर्थ-निश्चिति करणें अधिक बरें हें म्हणणें सर्वच भाषाभ्यासकांना पटावें. मराठीचा व्यावहारिक कोश अर्थनिष्पत्तीच्या बाबतींत फारसा कामाला येत नाही. त्यासाठी मराठी शब्दांचा ऐतिहासिक विकास दाखविणारा व त्यांच्या अर्थांचाहि क्रम दाखविणारा कोश व्हावयास पाहिजे. अशा विकासक्रम दाखविणाऱ्या कोशाच्या अभावीं काल्पनिक व्युत्पत्तींची उत्पत्ति चालूच राहणार आहे. प्राचीनतम मराठी शब्दांचीं रूपें व त्यांचे अर्थ निश्चित करतांना त्या काळच्या शेजारी भाषाभगिनींकडे लक्ष दिलें गेलें तर कांही निश्चित फायदा होण्याचा संभव आहे.

अपभ्रंशकालीन भाषा आजच्या प्रादेशिक भाषांएवढ्या निश्चित व पृथक् झालेल्या नव्हत्या. म्हणूनच जैन अपभ्रंशांतील ग्रंथांत मराठीपूर्व भाषेंतील दुवे सापडूं शकतील. गुजराती त्याच अपभ्रंश भाषेंतून विकास पावली. यामुळे पूर्व-गुजराती (पूर्व-राजस्थानी) भाषेच्या वेळची पूर्व-मराठी भाषा कांही बाबतींत त्या भाषेसारखी असणें संभवनीय आहे. नरेन्द्राचें 'रुक्मिणी-स्वयंवर', ज्ञानेश्वरांची 'ज्ञानेश्वरी' यासारख्या प्राचीन मराठी ग्रंथांत असे कांही शब्द आढळतात की, जे त्या वेळच्या गुजराती-राजस्थानींतहि असावेत, व आज मराठींतून गेले असून (किंवा पार बदलले असून) गुजरातींत मात्र आजहि रूढ आहेत. महानुभावांच्या इतर ग्रंथांतहि हे शब्द आढळतात. त्यामुळे सर्वसामान्य वाचकाला क्षणभर असेंहि वाटतें की, त्या पंथाचे संस्थापक श्री. चक्रधर मूळचे गुजरातेंतील असल्यामुळे हे समान शब्द महानुभावी ग्रंथांत आले असावेत !* पण असे शब्द ज्या 'रुक्मिणी-स्वयंवरांत' आहेत तो ग्रंथ नरेंद्राने महानुभावपंथ स्वीकारण्यापूर्वी लिहिलेला होता आणि तसे शब्द वारकरी संप्रदायाचा पाया घालणाऱ्या ज्ञानेश्वरांच्या 'ज्ञानेश्वरीं–'तहि आहेत. यामुळे जीं अनुमानें संभवतात तीं अशीं की, (१) एकतर त्या काळीं जवळजवळच्या प्रदेशांतील शब्दभांडार बरेंचसें लवचिक स्वरूपाचें व सरमिसळीचें असावें; (२) नाहीतर, भाषिक देवाणघेवाण त्या काळीं खूपच होत असावी. परंतु त्या काळची एकंदर सर्व परिस्थिति पाहतां पहिलेंच अनुमान अधिक संभवनीय वाटतें. तें कसेंहि असलें तरी अशा शब्दांच्या अभ्यासाने मराठीचा ऐतिहासिक क्रमदर्शक कोश अधिक शक्य व्हावा. पूर्व-गुजराती व प्राचीन गुजराती 'फागु'

---

* श्री. शहा नांवाच्या एका अभ्यासकाने गतवर्षीच्या एका दिवाळी अंकांत अशा तऱ्हेचें मत मांडल्याचें माझ्याप्रमाणेच अनेक वाचकांना आठवत असेल. —लेखक

अनुक्रमणिका

रचनांचा किंवा 'कान्हडदे प्रबंध' वगैरे ग्रंथांचा या तऱ्हेने अभ्यास होणेंहि असेंच अगत्याचें वाटतें.

सतराव्या-अठराव्या शतकांत जैन ग्रंथकारांनी मराठींत ओवीबद्ध रचना केल्या. त्यांतील बऱ्याच रचना मूळ गुर्जर अपभ्रंश किंवा पूर्व-गुजराती कथांवर आधारलेल्या आहेत, हें प्रो. जोहराबादकर यांनी मागेंच 'म. सा. पत्रिकें'तील लेखांत दाखवून दिलें आहे. जैन श्रमणक होतांना एका विशिष्ट चिमटयाने केस उपटावे लागतात, त्या क्रियेला 'लुंचणें' म्हणतात. तो शब्दप्रयोग 'ज्ञानेश्वरीं'त आलेला आहे. तसा प्रयोग जुन्या गुर्जर 'साहित्यां'त सापडणें शक्य आहे. 'लुंचन' असें संस्कृतीकरण गुजरातींत आहे.

यापुढे केवळ नमुन्यासाठी शब्द दिले आहेत. अशा शब्दांची ही संपूर्ण सूची नाही. तसेंच अशा तऱ्हेचा कयास पूर्वी कोणी केलाच नाही असेंहि माझें म्हणणें नाही. परंतु रूढ महानुभावी शब्दकोश किंवा 'महाराष्ट्र शब्दकोश' यांत अशा तऱ्हेचा तुलनात्मक निर्देश न आढळल्यामुळे हें धारिष्ट मी करीत आहें.

अंदु ( रु. ) सांखळी = अंदुक ( गुज. ) हत्तीच्या पायांतील साखळदंड.
आंकणा ( रु. ) चित्रें कोरलेला पायांतील दागिना = आंकणुं ( गुज. ) दागिन्यावरील चित्रें कोरावयाचें हत्यार.
आंगवण ( रु. ) = आंगमण–आगमण ( गुज. ) ताकत, जोर.
आठुवा ( रु. ) हात = अठवा ( डुं. ) ( गुज. ) हातभर मापाचा गज.
आ[illegible] ( रु. ) = आर्धो ( गुज. ) अर्धी.
उपनणें ( रु. ) = ऊपनवुं ( गुज. ) उत्पन्न होणें.
उभड ( रु. ) उभडें ( ज्ञा. ) = उभरो ( गुज. ) वर उतूं जाणें.
उलळणें ( रु. ) = उलळवुं ( गुज. ) उसळणें.
उलाळ ( रु. ) = ऊलाळ ( गुज. ) उसळी.
ओळग ( रु. ) = ओळग ( गुज. ) चाकरी, सेवा.
ओळगणें ( रु. ) = ओळगवुं ( गुज. ) सेवा करणें.
ओळगणी ( रु. ) दासी = ओळगणी ( गुज. ) भंगीण ( ! )
गरवार ( ज्ञा. ) = गरवो ( गुज. ) मोठा, श्रेष्ठ.
गाउवें ( रु. ) = गाउ ( गुज. ) कोसभर अंतर.
गांवार ( रु. ) = गंवार ( गुज. ) मूर्ख, अडाणी.
चौमेरीं ( रु. ) = चोमेर ( गुज. ) चारी बाजूंना.
टके ( ज्ञा. ) = टके ( गुज. ) टिकतें.
ढाळ ( रु. ) = ढाळ ( गुज. ) डौल; चाल, ढब.
ताव ( रु. ) = ताव ( गुज. ) उष्णता, ज्वर.
दादर ( ज्ञा. ) = दादरो ( गुज. ) जिना, पायऱ्या.
दी ( रु. ) = दी ( गुज. ) दिवस.
दुहणें–दुभणें ( रु. ) = दोहवुं ( गुज. ) दूध काढणें.
देज ( रु. ) = देज ( गुज. ) = दहेज ( हिंदी ) हुंडा, करणी.
नवाई ( ज्ञा. ) = नवाई ( गुज. ) नवल.

नारियेळी ( रु. ) = नारियेळी ( गुज. ) नारळीचें झाड.
निफजे ( ज्ञा. ) = निपजे ( गुज. ) उत्पन्न होणें, होणें.
पढियार ( रु. ज्ञा. ) = पढियारु ( गुज. ) आवडतें, भेट आलेलें.
पांजर ( रु. ) = पांजरुं ( गुज. ) पिंजरा.
पाटा ( रु. ) = पाटो ( गुज. ) पट्टी ( डोळ्यांवर बांधलेली ).
बारेया ( रु. ) = बारीओ ( गुज. ) खिडक्या.
बाळाणां ( रु. ) = बारणां ( गुज. ) दारें.
माणें ( रु. ) = भाणुं ( गुज. ) भोजन, भोजनानें भरलेलें ताट.
भोंय ( रु. ) = भोंय ( गुज. ) भुई.
मलपणें ( रु. ) = मलपवुं ( गुज. ) लचकणें, मुरडणें.
माळधर ( रु. ) = मालधर ? = मालदार ( गुज. ) श्रेष्ठ, श्रीमंत.
माय ( रु. ) = माय छे ( गुज. ) मावतें.
मोकलणें ( रु. ) ( ज्ञा. ) = मोकलवुं ( गुज. ) टाकणें, दूर पाठविणें.
महुडें-मेहुडें ( रु. ) = मेहुलो ( गुज. ) मेघ.
रससोय-रसोय ( ज्ञा. ) = रसोई ( गुज. ) सैंपाक.
लुगडें ( रु. ) = लूगडुं ( गुज. ) वस्त्र.
लुंचिली ( ज्ञा. ) = लुंचन ( गुज. ).
वसौट ( ज्ञा. ) = वसवाट ( गुज. ) वसाहत, वसति.
वहिला ( रु. ) = वहेली ( गुज. ) लौकर.
वळघणें ( रु. ज्ञा. ) = वळगवुं ( गुज. ) पकडणें, चिकटून वर जाणें.
वाणियर ( रु. ) = वाणियापणुं ( गुज. ) वाणिज्य.
वाळणें ( रु. ज्ञा. ) = वाळवुं ( गुज. ) दूर करणें, झाडणें.
वाल्ही ( ज्ञा. ) = वहाली ( गुज. ) आवडती, प्रिय.
वेलाउळ ( रु. ) = वेरावळ ? ( गुज. ) बंदर, एक बंदर.
सघर ( ज्ञा. ) = सध्धर ( गुज. ) ऐपतवाला, श्रेष्ठ.
साबडें ( रु. ) = साबड ( बोथुं ) ( गुज. ) भाबडें.
सांकड ( ज्ञा. ) = सांकडु ( गुज. ) अरुंद.
सुघड ( रु. ) = सुघड ( गुज. ) व्यवस्थित, सुघटित.
हलरु ( ज्ञा. ) = हालरडुं ( गुज. ) पाळणा-गीत, अंगाई-गीत.
हाथियेर ( रु. ) = हथियार ( गुज. ) हत्यार.
होड ( रु. ज्ञा. ) = होड ( गुज. ) पैज.

* * *

अनुक्रमणिका

व. वि. पारखे

# एक उपेक्षित मराठी महाभारतकार : पद्मनाभ ऊर्फ बाळकृष्णनाथ

मराठींत ज्या ज्या कवींनी व्यासभारत उतरविलेलें आहे त्या सर्वांचा संकलित आढावा घेऊन त्यांची माहिती देण्याचा प्रयत्न प्रथमतः कै. ल. रा. पांगारकर यांनी सरस्वतीमंदिर मासिकांत एक लेख लिहून केला.[1] याच लेखांत त्यांनी मराठी महाभारतांच्या निर्मितीची कारणमीमांसा करण्याचाहि प्रयत्न केलेला आहे. असाच दुसरा प्रयत्न कै. दा. के. ओक यांनी मुक्तेश्वरकृत विराटपर्वाच्या परिशिष्ट १ मध्ये केलेला आढळतो. या दोन्ही ठिकाणीं मराठी महाभारतकारांची केवळ जंत्रीच केलेली आढळते. साहजिकच त्यामुळे या महाभारतकारांचा व्यक्तिगत इतिहास आपणांस समजूं शकत नाही. मराठी महाभारतावर आजपर्यंत डॉ. सहस्रबुद्धे, कै. डॉ. नांदापूरकर आणि प्रा. डॉ. सौ. शेंडे या तिघांनी पीएच्. डी. साठी प्रबन्ध लिहिलेले आहेत. परंतु महाभारतकारांच्या बाबतींत, कै. ओक आणि पांगारकर यांनी दिलेल्या माहितीशिवाय इतर माहिती या प्रबन्धांत आढळत नाही; किंबहुना आज मराठींत, महाराष्ट्र-सारस्वतासारखा एखादा मराठी महाभारतकारांचा साहित्येतिहास सांगणारा ग्रंथच उपलब्ध नाही, असें म्हटल्यास चूक ठरणार नाही. असा प्रयत्न मी स्वतः माझ्या प्रबन्धासाठी करीत असून पद्मनाभाबद्दलची त्यांतील माहिती येथे प्रसिद्ध करीत आहें.

आज महाराष्ट्रास, बाळकृष्णनाथ ऊर्फ पद्मनाभ याचें नांवच फक्त एक महाभारतकार म्हणून माहीत असून त्याचा व्यक्तिगत परिचय कोठेंच करून दिलेला नाही. पद्मनाभाने रचलेलें उद्योगपर्व उज्जैन येथील ओरिएण्टल मॅनस्क्रिप्ट लायब्ररीमध्ये बघण्यास सापडतें. या ग्रंथालयाच्या सूचींतसुद्धा त्याच्या उद्योगपर्वाचा उल्लेख केलेला आहे.[2] उद्योगपर्वाच्या शेवटीं पोथीची नकल करणारा म्हणतो—" ईदं पुस्तकं केशव सविराम । उपनाम पंडित । शके १७८४ उत्तरायणे । वसंतऋतौ चैत्रकृष्णपक्ष्ये......समाप्त. " या उल्लेखानुसार पद्मनाभाच्या उद्योगपर्वाची नकल केशव पंडित याने शके १७८४ त केली हें स्पष्ट होतें.

पद्मनाभाच्या उद्योगपर्वाचे ९० अध्याय असून ओवीसंख्या सुमारें २०,००० इतकी असावी. आजतरी मराठी महाभारतांत एकाच पर्वावर सर्वांत मोटी रचना करणारा म्हणून पद्मनाभाचेंच नांव घ्यावें लागेल. उद्योगपर्वाच्या शेवटच्या अध्यायांत स्वतःबद्दलची माहिती सांगतांना पद्मनाभ म्हणतो—

विदर्भदेशी जलग्रामीं । आश्वलायन राजुर्कर उपनामीं ।
राघावामनाच्या संगमीं । होईल मम नाभि उद्भव तुझा ॥ २१ ॥

---

१. सरस्वतीमंदिर द्वैमासिक, इ. स. १९०४.

२. Oriental Manuscripts Library Catalogue Part I, page 36, No. 777,

जे दशांश कळा तुझ्या ठाईं । पंच्याचा उद्भवति त्याचे देहि ।
तुझा प्रतापार्क आधी पाहि । मिरवे महि तया आंगि ॥ २२ ॥

तुझ्या देहे अवसानाते । वियो न साहवें नामाते ।
म्हणोनि मागितले ग्रंथाते । जाण निरुते पढावया ॥ २३ ॥

पुढे बाळपणी बाळकृष्णा । उद्भवेल दर्शनाची तृष्णा ।
पिता घेऊनि येता पुर्णप्रश्ना । उडवी श्रीब्रह्मा मम भेटी ॥ २४ ॥

हरिभक्त आणि शुचिष्मंत । उभय कुळेसि विराजमंत ।
दिसोदिस विशेष वृद्धिमंत । जेवि कलावंत द्वितियेचा ॥ २५ ॥

हरिभक्त आणि तया ओळखोनि स्वभाव । मठाधिकारी आचार्यभव ।
तया दृष्टांते करूनि गौरव । ग्रंथवैभवा धावयासि ॥ २६ ॥

वरदहस्त स्थापोनि शिरिं । ग्रंथ घालोनि त्याचे पदरिं ।
मग तुझा तूंचि प्रकट करि । जनभवपुरि तारावया ॥ २७ ॥

तया मुखें ग्रंथ आति रसाळ । प्रकटोनि भेदत ब्रह्मांडगोळ ।
यावच्चंद्रसूर्य अचंचळ ।...लो ग्रंथ विमळ मम वरदे ॥ २८ ॥ अध्याय ९०.

या नवीन उपलब्ध झालेल्या माहितीवरून पद्मनाभ विदर्भातील ( त्या वेळीं ) जळगांव येथील रहिवासी होता असें समजतें. आश्वलायन शाखेतील राजूरकर घराण्यांत राघा व वामन या दाम्पत्याच्या उदरीं पद्मनाभाचा जन्म झाला, असें या ओव्या आपणांस दर्शवितात. बाळपणीं पद्मनाभाला बाळकृष्ण म्हणत असावें असें वाटतें. या ओव्या वाचीत असतां बाळकृष्णनाथ ऊर्फ पद्मनाभ याला आपल्या भारताच्या यशाबद्दल फार खात्री वाटत असावी, असा संशय आपल्या मनांत येतो. तो स्वतःच आपल्या ग्रंथाला, ' रसाळ आणि जनांना भवपुरींतून तारणारा असा ग्रंथ, ' असें मानतो.

उद्योगपर्वाच्या शेवटीं पद्मनाभ म्हणतो — ' असो तयावतारा अंति ।....पर्व समाप्त जालें । पुढे भीष्मपर्व श्रोतियाच्या कृपाबळें । वर्णिन भले म्हणे पद्मनाभ ॥ ' या उल्लेखावरून पद्मनाभाने भीष्मपर्व रचिलें असावें असें वाटतें. परंतु याच्या भारताच्या इतर पर्वांचा मात्र अजूनपर्यंत पत्ता लागलेला नाही. उद्योगपर्वांत मात्र या कवीची इतकीच माहिती आपणांस आढळून येते. मराठी साहित्याचा इतिहास नव्याने लिहितांना या माहितीचा उपयोग व्हावा, असें वाटल्याने ही माहिती प्रसिद्ध केली जात आहे.

* * *

# साहित्य-समीक्षा

## टीका

### पराभवांचीं रहस्यें

या लहान ग्रंथांत दोनच दीर्घ निबंध आहेत व दीर्घ व्यासंगाने ठाम झालेलीं कांही प्रमेयें लेखकाने या निबंधांतून मांडलेलीं आहेत. पहिला निबंध महानुभावपंथाच्या पराभवासंबंधी आहे. दुसरा केशवसुतांच्या काव्यामागील प्रेरणेसंबंधी आहे. दोन्ही निबंधांमध्ये विषयाची मांडणी चांगली व उपोद्‌बलक अवतरणांसह केली आहे. या दोन्ही विषयांवरील अभ्यासकांना हा ग्रंथ म्हणूनच अभ्यसनीय ठरेल.

महानुभावांचें तत्त्वज्ञान समाजविन्मुखतेचें आहे ही गोष्ट प्रा. सरदारांनी मागेच सप्रमाण मांडली असून जैनांच्या आचारविचारांशीं महानुभावांच्या कर्मकांडाचें साम्य असल्याचेंहि त्यांनी दाखविलें आहे. प्रस्तुत लेखकानेंहि हीच भूमिका घेतली असून या समाजविन्मुखतेंत महानुभावांच्या पराभवाचें रहस्य आहे, असें प्रतिपादन केलें आहे. समाजाशीं संबंध टाळून, रूढ जातिधर्म, कुलधर्म इत्यादींचा पूर्णपणें त्याग करून, व्यक्तीने परमेश्वराची आराधना करावी आणि त्याच्या कृपेने मोक्ष मिळवावा असा उपदेश चक्रधरांनी केला. परंतु, वैराग्याचें हें महत्त्व भागवतपंथीयांनीहि मानलें आहे आणि मोक्ष हेंच व्यक्तीचें परमसाध्य ठरविलें आहे. समाजविन्मुखता किंवा वैराग्य यांना आपल्या सर्वच पंथामध्यें महत्त्व आहे. या बाबतींत बौद्ध आणि जैनपंथीयांची भूमिका महानुभावांपेक्षा कमी कडक नव्हती व तरी या पंथांनी भारतांत अनेक शतकें प्रभाव गाजविला हें उघड दिसत आहे. यापेक्षा थोडी पलीकडे दृष्टि टाकली तर असें दिसतें की, प्रारंभकालीन खिस्तपंथीयांनीहि समकालीन सामाजिक कर्तव्यांचा व आचार-विचारांचा त्याग करून एकप्रकारचा विजनवासच पत्करिला होता. त्यांच्यामध्ये आपसांतल्या व्यवहारांपुरतें भ्रातृत्व होतें व तसें तें महानुभावांतहि असावें. खिस्ती-पंथीयांमध्ये प्रारंभकाळीं वैराग्य आणि निवृत्तिपरता असूनहि पुढे या धर्माने विश्वविजयाची आकांक्षा धरली व ऐहिकाच्या आराधनेंत कसूर केली नाहीं. सारांश, महानुभावांच्या समाजविन्मुखतेबद्दल एवढेंच म्हणतां येईल की, रूढ चातुर्वर्ण्यविहित व्यवहाराचा उबग आल्यामुळे विटून समाजविन्मुखतेकडे वळलेल्या लोकांना तो पंथ स्वीकाराई वाटला. त्यांच्या पराभवाचें रहस्य त्यांच्या वैराग्यांत नसून रूढ समाजसंकेतांच्या त्यागांत होतें असेंच खरोखर म्हणतां येईल.

लेखकाने असेंहि म्हटलें आहे की द्वैतवाद पत्करल्यामुळें महानुभावांना 'व्यक्तिनिष्ठ' आणि समाजविन्मुख होणें भाग होतें. खरा समाजसन्मुख तत्त्वचिंतक अद्वैतीच असावा लागतो असें त्यांनी मोठ्या आग्रहाने प्रतिपादिलें आहे. अद्वैत मानल्याने मनुष्य समाजसन्मुख होतो

---

**पराभवांचीं रहस्यें**—[ लेखक व प्रकाशक : प्रा. मु. म. जावडेकर, ४९९ शनिवार, पुणें २; मूल्य २॥ रु. ]

अनुक्रमणिका

आणि द्वैत मानणारीं माणसें समाजाला पारखीं होतात या लेखकाच्या श्रद्धेंत त्याचा अद्वैतवादावरील गाढ विश्वास दिसतो खरा, परंतु तत्त्वज्ञान आणि नीतिशास्त्र यांच्या परस्परसंबंधाबद्दल त्याची भूमिका पुरेशी व्यापक आहे असें दिसत नाहीं.

अशाच एका श्रद्धान्वित कल्पनेच्या आहारीं जाऊन केशवसुतांच्या प्रेरणेविषयी लेखकानें आपलें प्रतिपादन केलेलें आढळतें. लेखकानें केशवसुतांच्या काव्यांतील सौंदर्यस्थळें मोठ्या रसिकतेनें हेरलीं आहेत. त्या स्थळांशीं, आणि एकंदरींत केशवसुतांच्या काव्यप्रतिभेशीं, वैदिक वाङ्मयांतील रसपूर्ण सूक्तांचें व वैदिक ऋषींच्या प्रतिभेचें साम्य त्याला दिसलें आहे. हें साम्य पाहून तो म्हणतो की, केशवसुतांनी वैदिक वाङ्मयांतूनच स्फूर्ति घेतली आहे. केशवसुतांनी शेली आणि वर्ड्स्वर्थ या इंग्रज कवींच्या काव्याची उसनवारी केली आहे असा एक गैरसमज रूढ होता, त्याचें निराकरण करण्याच्या प्रयत्नांतून लेखकाचा हा निष्कर्ष निघाला आहे, असें म्हणतां येईल. निराकरणापुरतें पाहावयाचें तर लेखकानें आपला निष्कर्ष मोठ्या व्यासंगी पद्धतीनें व ठसठशीतपणें मांडला आहे. पण मला हा निष्कर्ष एकांगी वाटतो. केशवसुत आणि त्यांच्या वेळचे समाजसुधारक इंग्रजी संस्कृतीने दिपून गेलेले नव्हते व भारतीय संस्कृतीचे व परंपरेचे कट्टर अभिमानी होते. पण त्यांचा हा अभिमान डोळस होता. परंपरेची पुनरावृत्ति त्यांना नको होती. किंबहुना, भारतीय राहूनहि एका नव्या मानवी संस्कृतीकडे वळण्याचें सामर्थ्य या नव्या द्रष्ट्यांमध्ये होतें. वैदिक ऋषींच्या उद्गारांतून त्यांनी स्फूर्ति घेतली तशीच शेली-वर्ड्स्वर्थच्या काव्यपंक्तींतूनहि घेतली. नव्या युगांतराच्या सीमेवरील हीं मोठीं माणसें स्वतःच्या एका नवजात प्रतिभेच्या बळानें बोलत होतीं. केशवसुतांच्या कवितेंत वैदिक सूक्तांचा पडसादच न पाहतां एका युगांतराची चाहूल लेखकालाहि दिसेल. त्यासाठी, केशवसुतांना इंग्रजी कवितेचे दास मानणाऱ्या टीकाकारांच्या वचनाकडे जास्त लक्ष न देतां केशवसुतांच्या काव्याकडे व त्यांच्या काळांतील जाग्रत प्रेरणांकडे डोळसपणें पाहण्याची दृष्टि मात्र हवी.

दि. के. बेडेकर

## बालवाङ्मय

बालवाङ्मयाची चर्चा करणारें एक स्वतंत्र पुस्तक निघावें ही आनंदाची गोष्ट आहे. मराठी साहित्याची ही शाखा आजवर उपेक्षितच राहिली आहे. अनुकरण किंवा अनुवाद यापलीकडे मजल गेलेली नाहीं. इतर ललित साहित्यांत अपेशी ठरलेले किंवा यश मिळेल अशी खात्री नसलेले या दालनांत घुसतात. केवळ सुबोध भाषेच्या जोरावर बालरंजन करूं पाहणाऱ्या प्रतिभाशून्य लोकांनी येथे गर्दी केली आहे. बालवाङ्मयासाठी कांही स्वतंत्र दृष्टि, वृत्ति आणि साधना यांची जरुरी असते याची जाणीवच नाही, अलीकडे ही स्थिति थोडीशी पालटत आहे. प्रस्तुत पुस्तक हें या दृष्टीने प्रसादचिन्हच म्हटलें पाहिजे.

श्री. देवीदास बागूल यांनी हें पुस्तक साक्षेपाने लिहिलें आहे. सामग्री गोळा करण्यांत यत्किंचित् कसूर केलेली नाही. पानांची मर्यादा पडल्यामुळे त्यांना महत्त्वाची माहिती आणि चर्चा दाटीवाटीने बसवावी लागली आहे हें स्पष्ट दिसतें. उदाहरणें देण्याऐवजी ग्रंथांच्या नामोल्लेखावरच बरेच ठिकाणीं भागवावें लागलें आहे. परंतु बालसाहित्याचें अंतरंग आणि

---

बालवाङ्मय—[ लेखक : देवीदास बागूल; चिरंजीव ग्रंथ प्रकाशन, टिळक रस्ता, पुणें २; किं. ३ रु. ]

बहिरंग यांतला कुठलाहि तपशील सुटूं नये यासंबंधी त्यांना लागलेली तळमळ या पुस्तकांत ठिकठिकाणीं व्यक्त होते. बालवाङ्मयांतल्या पहिल्या पहिल्या प्रमुख प्रयत्नांची नोंद त्यांनी व्यवस्थित केली आहे, पण कांहीं त्रुटी जाणवतात. चित्ररूप गोष्टी देणारें ‘ बालोद्यान ’ नांवाचें मासिक शिळाप्रेसवर निघत असे. जनावरांचें मानुषीकरण हा या मासिकांतील गोष्टींचा विशेष होता. या मासिकाला उदंड लोकप्रियता लाभली. यांतील चित्रकथांची, तसेंच ‘ सयाजी-बाल-साहित्य ’-मालेंतील कांही चांगल्या पुस्तकांची चर्चा व्हायला पाहिजे होती. शिरगुप्पीकर या बाल-रंगभूमीच्या आद्यप्रवर्तकाची कामगिरी सादर चर्चिली जाणें अवश्य होतें. उपाध्ये, अज्ञातवासी, खानविलकर, लिमये इत्यादींचीं कांही शिशुगीतें बागुलांनी ज्यांचा सादर उल्लेख केला आहे अशा कित्येक कवींच्या रचनेइतकीं खासच सुश्लिष्ट आहेत. विशेषतः त्यांतला विनोदाचा भाग उल्लेखनीय ठरेल. विज्ञानाच्या आधारावर ज्या कल्पित कथा आहेत त्यांत ‘ साराच चमत्कारा ’-सारखी कृति निदान टीकेसाठी चर्चेला घेण्याइतकी तरी खास वैशिष्ट्यपूर्ण होती. गिजूभाई बधेका यांच्या अनुपम कथनपद्धतीवर गोष्टी लिहिण्याचे प्रयत्न झाले त्यांची दखल घेणें जरूर होतें. आणखीहि अशा उणिवा दाखवितां येतील. पण हें दाखविण्यांत टीका करण्याचा उद्देश नाही. लेखकाचें लिखाण भोंगळ असतें तर या उणिवा दाखविण्याची जरूरच नव्हती. लेखकानें परिपूर्णता साधण्याचा आटोकाट प्रयत्न केला आहे. त्यामुळें थोड्याहि उणिवा राहूं नयेत, दुसऱ्या आवृत्तीच्या वेळीं त्या दूर करण्याची व्यवस्था व्हावी, यासाठी वरील दोष-दिग्दर्शन केलें इतकेंच.

आणखी एका गोष्टीचा निर्देश करणें जरूर आहे. गेल्या कांही वर्षांत आकाशवाणी हें शिशुरंजनाचें फारच मोठें साधन उपलब्ध झालें आहे. कथा, कविता, संवाद यांचें रसग्रहण केवळ श्रवणाच्या माध्यमाने करावें लागतें. अर्थात् थोडें नवें आणि अवघड तंत्र लेखकाला अवलंबावें लागतें. तसें पाहिलें तर या तंत्रांत अधिक कल्पकता आहे आणि तें अत्यंत प्रभावी तर आहेच आहे. बाल-साहित्य-साधनेचीं कांही नवीं सूत्रें यामुळे तयार होत आहेत. श्री. बागूल यांनी याविषयींच्या विवेचनास एक स्वतंत्र प्रकरण द्यायला हवें.

या पुस्तकांत मतैक्याचीं स्थळें पुष्कळच आहेत. बालवाङ्मय हें मुलांकरिता असलें तरी तो एक ललित वाङ्मयाचाच भाग आहे. अर्थात् ललित वाङ्मयाला सौष्ठव आणणारीं तत्त्वें स्थूलमानानें बालवाङ्मयालाहि लागू पडतात. बालवाङ्मयांत खेळपणाइतकी रंगरसस्पर्शादि संवेदनांना जागृत करणारी सामग्री भरपूर असली पाहिजे. यासंबंधीचें श्री. बागूल यांचें विवेचन मूलग्राही आणि पटणारें आहे. नाद आणि कल्पना यांची चमत्कृति मुलांना आवडते. पण येथे नुसता बुद्धीचा विलास उपयोगी पडणार नाहीं. कथा किंवा कविता यांत कांहीं अकल्पित आलें एवढ्याने मुलांना गंमत वाटणार नाही, त्यांत सहजताहि पाहिजे. भोंडल्याच्या गाण्यांत असंबद्ध ओळी कितीतरी येतात. निरर्थक शब्दहि आढळतात. पण त्यांचा नाद हृदयंगम असतो. बुद्धीची कसरत करण्यासाठीं असंबद्धता किंवा चमत्कृति आणलेली नसते. श्री. बागुलांनीं शिशुगीतांची चर्चा करतांना या गोष्टीवर अधिक भर द्यायला पाहिजे होता. त्यांनी केलेली विस्तृत चर्चा कांही कवितांची तोंडओळख किंवा भलावण करण्यासाठी केलेली वाटते.

मूल्यमापन करतांना नव्याला झुकतें माप देण्याची श्री. बागुलांची प्रवृत्ति दिसली तरी स्तुति किंवा टीका करतांना व्यक्तिमाहात्म्याचें दडपण त्यांनी मनावर पडूं दिलें नाहीं हें अभिनंदनीय म्हटलें पाहिजे. बागूल हे नुसते टीकाकार नाहीत. त्यांनी सर्जनात्मक लेखनहि केलें आहे. यामुळे या बालवाङ्मयचर्चेला कांही वेगळाच रंग चढला आहे. कांहीं कृतींच्या

तोंडओळखींत प्रमाणाबाहेर जागा गेल्याने इतर कांही ठिकाणीं आवश्यकता असूनहि विस्तार करतां आला नाही. असें असलें तरी बालवाङ्मयाची जाणीवपूर्वक व सडेतोड चर्चा करणारें एक भरीव पुस्तक म्हणून संदर्भ व टीका या दोनहि दालनांत हें मान्यता पावेल.

गोपीनाथ तळवलकर

## नाटकें

### वेगळं व्हायचंय् मला

एखाद्या घटनेंतील, व्यक्तिमत्त्वांतलि किंवा अमूर्त कल्पनेंतील नाट्याची लेखकाला भुरळ पडावी, त्याला जाणवलेलें तें नाट्य इतरांनाहि प्रतीत व्हावें म्हणून त्यानें नाटक लिहावें. सर्व-साधारणपणाने नाटकाचा जन्म या रीतीने होत असतो.

पण नाटकाच्या जन्माची याहीपेक्षा एक वेगळी रीत असूं शकते हें 'वेगळं व्हायचंय् मला' हें नाटक वाचल्यावर उमगतें. ही तऱ्हा म्हणजे प्रेक्षकांची आवड — नाटकाला पैसे खर्च करून येऊं शकणाऱ्या प्रेक्षकांची आवड–पथ्यें–कुपथ्यें, लहरी सारें संभाळून तीन अंकांत विभागतां येतील असे संवाद लिहिणें. ते संवाद मग तितक्याच सुगरणपणाने सादर केले की एक यशस्वी, गाजणारें आणि गरजणारें नाटक रंगभूमीवर प्रयोगाच्या शेकड्यांची वाटचाल विश्वासाने करीत राहतें.

महाराष्ट्रांतला मध्यमवर्गीय प्रेक्षक ज्या ज्या बाबतींत हळवा आहे—डोहाळतुली, पाहिलटकरीण, लोणचें, लोटणें होऊं घातलेला (पण खरें म्हणजे सज्जन, वत्सल असलेला) म्हातारा, नववाङ्मय विरुद्ध जुनें वाङ्मय इ. इ.—त्या साऱ्या नाटककाराने अचूक हेरल्या आहेत आणि नळ फिरवून पाणी काढावें इतक्या सहजतेनें या साऱ्या हळव्या जागांना स्पर्श करून प्रेक्षकांच्या डोळ्यांतून सामुदायिक अश्रुपात घडवलेला आहे.

नाटक पाहतांना प्रेक्षकांच्या विचारशक्तीला अथवा ग्रहणशक्तीला कुठलाहि त्रास पडूं नये यासाठी लेखकाने घेतलेली काळजी उल्लेखनीय आहे. रात्रींचें जेवण आटोपून, सुपारीचें खांड चघळत, डोक्यावर टोपी ठेवून, झोपाळलेलें कलत्र आणि नाटकापेक्षा स्वैरकथांसाठीच बाहेर पडलेल्या लेकीसुनांना बरोबर घेऊन नाटकाला आलेल्या आणि प्रेक्षागृहांतल्या खुर्चीवर मांडी ठोकून बसलेल्या प्रेक्षकांना नसत्या बौद्धिक अगर भावनिक चाळवाचाळवीमुळे उगाच बैठक मोडावी लागूं नये याची एखाद्या साक्षेपी यजमानाप्रमाणे नाटककाराने दक्षता घेतलेली आहे.

आधी मुळी गुण्यागोविंदाने वागणाऱ्या एकत्र कुटुंबाचीं शकलें होऊन त्याचीं फारकतलेलीं बारकीं कुटुंबें होणें ही समस्या आज तरी मध्यमवर्गाच्या जिव्हारीं बोचण्याइतकी तीव्र राहिलेली नाही. या प्रश्नाला त्याला मागेच तोंड द्यावें लागलेलें आहे आणि पोट भरण्यापुढे बाकी सारें गौण आहे हें सत्य त्याला केव्हाच उमगलेलें असल्यामुळे, त्याने या बाबतींत फारसें हळवें न होतां तो सोडवलेला आहे. आज विभक्त कुटुंबाच्या प्रश्नाचा फार तर वण राहिलेला आहे. मध्यम-वर्गाच्या काळजाशीं ठुसठुसणारीं दुःखें, त्याला जीवन असह्य करणाऱ्या जखमा वेगळ्याच आहेत. पण वाहत्या जखमेला चुकूनहि हात लागला तर ज्या वेदना होतात त्यांनी खुर्चीवरची बैठक

---

वेगळं व्हायचंय् मला—[ लेखक : श्री. बाळ कोल्हटकर; प्रकाशक : के. वा. जोशी, २५ बुधवार, पुणें २; किंमत २ रु. ]

मोडण्यापेक्षा फारच कांहीतरी भयंकर घडलें—आणि तसलें नाटक प्रेक्षक बघायचेंच टाळतो हें लेखकाने पुरतेंच ओळखलेलें आहे. याउलट निरुपद्रवी व्रण जर कुरवाळला तर त्या सहानुभूतीने प्रेक्षक सुखावण्याचा संभव ध्यानांत घेऊन श्री. कोल्हटकरांनी हें नाटक लिहिलेलें आहे.

उगीच कुणाला मनस्ताप नको म्हणून या नाटकांतलीं सारींच माणसें कशीं एकमेकांवर प्रेम करतात. त्यांतल्या त्यांत जीं वाईट माणसें त्यांच्यादेखील आगमनाच्या सूचना लेखकाने आधीच देऊन ठेवलेल्या आहेत! उगाच त्या वाईटपणाने प्रेक्षकांना धक्का बसायला नको. संध्याकाळचें 'आस्तिक आस्तिक' म्हणत अण्णा घरांत जातात तोंच नाटकांतला तथाकथित खलपुरुष विनायक 'विघ्ने' येतो! दारच्या काकड्यांतली एक कडू निघाल्याचें कळतें तोंच घरांतला कडू मुलगा प्रवेश करतो......पण पुढे हींहि वाईट माणसें चांगलीं होतात, प्रेम करूं लागतात आणि सारेंच सुखान्त होतें! मुलाचा प्रेमविवाह ठरलेला असतांहि हुंडा मागणाऱ्या बापाला विरोध करून आपल्या आवडीच्या मुलीशीं लग्न करायला आलेल्या प्रियकराबरोबर या घरांतली मुलगी पळूनबिळून जात नाही. ती हुंड्याचा पैसा घरीं जमा होईपर्यंत थांबायचें अगर लग्नहि मोडायचें ठरवते इ.

"मोहोर कितीहि जास्त झाला तरी आम्रवृक्षाला भार नाही होत त्याचा!" "चकाकणारी प्रत्येक वस्तु सोन्याच्या मोलाची असती तर पितळेचीं भांडीं सोनाराच्याच दुकानांतून विकत घ्यावीं लागलीं असतीं!"... अशीं कितीतरी जीवनविषयक अन्तिम सत्यें जागोजाग आकर्षक पुड्यांतून या नाटकांत ठेवलेलीं आहेत. लहर लागेल तेव्हा एखादें तोंडांत टाकावें नि आरामांत चघळावें!—

असें हें मध्यमवर्गीय प्रेक्षकांच्या दृष्टीने सुखसंवेद्य नाटक. वास्तवाच्या हुलकावण्या देत केव्हाच अवास्तवांत नेऊन फिरवणारें — पण सुख देणारें नाटक. ज्या उत्साहाने प्रेक्षकांनी तें उचलून धरलें आहे त्यानेच लेखकाच्या चातुर्याचें आणि श्रमांचें सार्थक झाल्याची ग्वाही दिलेली आहे.

नव्या दमाच्या दिग्दर्शकांनी मोठ्या शर्थीने बसवलेलीं नाटकें पांचसात प्रयोगांतच, मिळकतीच्या दृष्टीने तोट्यांत येऊन, गुंडाळावीं लागत आहेत. नव्यानव्या नाटकांचे जन्म आणि मृत्यु निर्विकारपणाने पाहायचें आपल्या प्रेक्षकांच्या चांगलेंच अंगवळणीं पडलें आहे. नाटकें पाहण्याची त्यांची सवय टिकवून धरणारें म्हणून 'वेगळं व्हायचंय् मला' या नाटकाचें आणि श्री. कोल्हटकरांचें आपण अभिनन्दन करायला हवें!

## जाणार कुठं?

ग्रामीण जीवन निरागस, निकोप असतें. जिवाभावाने माया करणारें, संरक्षण देणारें असतें. व्यवहारी नागर जगाचे कडू जमाखर्च त्याला अवगत नसतात....... इ. इ. — अशी कल्पनारम्य जाणीव ग्रामीण जीवनाबद्दल एके काळीं होती. ग्रामीण जीवनाच्या असंस्कृत लावण्याचे गोडवे गाणारें वाङ्मय एके काळीं मराठींत प्रभूत प्रमाणांत होतें. या सुटलेल्या पायांना जमिनीवर आणण्याचें काम ज्या लेखकानें केलें त्याच लेखकाने हें नाटक लिहिलेलें आहे. हें नाटक मात्र ग्रामीण जीवनाबद्दल वर सांगितलेल्या सर्व कल्पना मोठ्या भाक्तिभावाने

---

जाणार कुठं?—[ लेखक : व्यंकटेश माडगूळकर ]

उरापोटाशीं बाळगतें आहे. गुण्यागोविंदानें नांदणाऱ्या ग्रामजीवनांत लोखंडाच्या पायाच्या अवदसेचा — म्हणजे मोटारीचा आणि म्हणजेच शहरी, यन्त्राङ्कित संस्कृतीचा — शिरकाव झाला आणि तें बिचारें ग्रामजीवन उद्ध्वस्त झालें असें दाखवायचा या नाटकांत प्रयत्न आहे.

यंत्राच्या आगमनामुळे ग्रामीण जीवनाची हानि झाली असें आता जाणते लोक मानीत नाहीत. उलट या दरिद्री, रोगट आणि अडाणी जीवनाला सुधारायला पुरेशी यन्त्रसामग्री आपल्याजवळ नाही याचेंच सध्या आपल्याला दुःख आहे. यासाठी आपले आटोकाट प्रयत्न चालू आहेत.

'जाणार कुठं ?' या नाटकांतील समस्येचा हा असला कालबाह्यपणा नाटकासाठी म्हणून बाजूला ठेवला तरी स्वतःच्या चुकीच्या कल्पना का होईना, पण परिणामकारकपणें सांगणारें एक नाटक म्हणूनहि तें फारसें यशस्वी ठरत नाही हें आपल्या लक्षांत येतें.

" मला दिसतीया मसनवाट. जळकीं लाकडं, राख. फुटकीं मडकीं. दोन पायांवर बसून रडणारीं कोल्हीं. डोळं गाळणारं आभाळ!" भरल्या घरांत, परंपरागत कुंभाराचा धंदा इमानानें करून समाधानांत राहणाऱ्या पण लोखंडी पायाच्या अवदसेच्या फेऱ्यामुळे होणारा विध्वंस आधीच पाहूं शकणाऱ्या इजाप्पाचा हा जीवघेणा आकान्तहि आपल्या काळजाला भिडूं शकत नाही.

" बाळा, काय रं मिळवलं तुमी? मोटार आली, रेल्वे आली, ईज आली, बत्ती आली, नळ आला, चावी आली आन् तेच्या बदलीं काय दिलं? अन्न दिली, इस्वास दिला, अभिमान दिला, माया दिली, अंगांतलं बळ दिलं... आनंद दिला!" नाटकांतल्या साऱ्या घटनांचें सार शेवटीं नाटककाराला—आपल्या पात्रांच्या तोंडीं न शोभणारे शब्द घालूनहि—सांगावें लागलेलें आहे. तात्पर्य, सांगावें तसें. पण हें तात्पर्य नाटकांतून ज्या तीव्रतेनें आणि ज्या अपरिहार्यतेनें जाणवायला हवें तसें जाणवत नाही. कारण जी माया, आनंद, बळ गांवांत होतीं असें इजाप्पा म्हणतो, तींहि आपल्याला जाणवत नाही नि जो विध्वंस आला असें तो तळमळून सांगतो, तोहि आपल्याला दिसत नाही. ग्रामीण जीवनांतील ( सांगीव का होईना ) समृद्धि आणि यंत्रागमनामुळे त्या समृद्धीचा झालेला विध्वंस हीं दोन्ही आपल्याला प्रत्यक्ष नाटकांत दिसत नाहीत. प्रत्यक्षीकरणाच्या अभावामुळे इजाप्पाची आणि नाटककाराची व्यथा आपल्या जिव्हारीं भिडत नाही—घराच्या दारांतलें जुनें देऊळ आपल्यासमोर फोडणें, आईनें लावलेला निंब तोडणें अशा क्षोभजनक घटनांची मदत घेऊनसुद्धा भिडत नाही.

अनेक अनावश्यक पात्रांची आणि प्रसंगांची —आपल्या चित्रपटांतच चालू शकणारी—भरती केल्यामुळेहि हें नाटक कसें फुटल्यासारखें होतें.

ग्रामीण भाषेचा सच्चेपणा, चटपटीत स्वभावचित्रण, अपत्यहीन वंचाच्या दुःखाचें नीटस दर्शन हीं या नाटकाचीं आकर्षणें. पण तेवढ्याने नाटक तारलें जात नाही. प्रस्तुत समस्येची फार वरवरची हाताळणी, ग्रामीण जनतेच्या सुखांत आणि दुःखांतहि या नाटकापुरतें तरी फारसें खोल बुडूं न शकलेलें लेखकाचें मन, यामुळे हें नाटक परिणामकारक होऊं शकलेलें नाही.

सरिता पद्की

## कथा

### पारध : ( शिकार-कथांचा संग्रह )

मराठीमध्ये शिकारीचे वृत्तान्त पुष्कळच लिहिले गेले व त्यांच्या निमित्ताने अनेक रोमांचकारी प्रसंगांचें वर्णन मराठी साहित्यांत आलें भानू शिरधनकर, श्री फडतरे यासारख्या कांही लेखकांची नांवें या संदर्भात सहज लक्षांत येतात. पण शिकारीच्या निमित्ताने घेतलेल्या अनेक अनुभवांतून काल्पनिक शिकारकथा रंगविण्याचे प्रयत्न मराठींत फार थोडे झाले. इंग्रजींत 'शिकारीच्या कथा' म्हणून एक कथांचें स्वतंत्र दालन आहे. मराठींत हें दालन समृद्ध होऊं शकलें नाही याचें कारण सहज सांगतां येण्यासारखें आहे कथालेखनाची आवड असणाऱ्या साहित्यिकाला शिकारीचें वेड नाही व शिकारीचें वेड असणारा शिकारी साहित्याच्या वाटेला जात नाही.

सुदैवाने मधु कर्णिक दोन्हीहि गोष्टींत पारंगत दिसतात. शिकारीचा तर त्यांना छंद आहेच. कथांतून ठिकठिकाणीं आलेली शिकारीचीं वर्णनें त्याची साक्ष देतील व ज्या पद्धतीने ते गोष्ट रंगवितात त्यांत त्यांच्या लेखनाचा कलात्मक पैलू पण दिसून येतो. शिकार-कथेचा पहिला आवश्यक घटक म्हणजे वातावरणनिर्मिति. घनदाट अरण्य, मध्यरात्रीचा काळोख, रातकिड्यांचा होणारा आवाज आणि त्यामधूनच येणारी व्याघ्रराजाची गर्जना व त्यापाठोपाठ जंगलांत दुमदुमणारे बंदुकीचे आवाज या सगळयांचा परिणाम वाचकांच्या मनावर काय होत असेल याची कल्पना सहज करतां येते. हें वातावरण केवळ कल्पनेने निर्माण करतां येत नाही. त्याला प्रत्यक्ष अनुभव पाहिजे. ती धुंद देहोधी अनुभविली असली पाहिजे. अशा तऱ्हेचें वातावरण यशस्वी रीतीने निर्माण करण्याचें सामर्थ्य श्री. कर्णिक यांच्या लेखणींत भरपूर आहे. या कथा जरी काल्पनिक असल्या तरी त्यांत प्रत्ययकारिकता आहे व वातावरणनिर्मितींत जिवंतपणा आहे. 'एका शिकंदर काडतुसाची गोष्ट,' 'भैरवगडचा नरराक्षस,' 'बिबट्याशीं झुंज' यासारख्या कथा वाचतांना याचा अनुभव येतो. कथानायकाबरोबर जणू आपण त्या सर्व गोष्टींचा अनुभव घेत आहोंत असा भास होतो व चित्त थरारून जातें.

शिकारीच्या सूक्ष्म तपशिलांचें वर्णन तर जागोजाग आलें आहेच, पण हिंस्रपशूंच्या सवयीचें, त्यांच्या हालचालींचें, त्यांच्या क्रूरतेचें ठिकठिकाणीं आलेलें वर्णन अंगावर शहारे आणतें. कांही ठिकाणीं तर सुरेख शब्दचित्रें ते आपल्या डोळ्यांसमोर उभीं करतात. 'बिबट्याशीं झुंज' मधील खालील वर्णन पाहा :

"त्या पाणवठ्याची खडान् खडा माहिती असलेला तो वाघ मग हलकेच खाली वाकला नि निर्धास्तपणें जीभ बाहेर काढून लपालप पाणी पिऊं लागला. काळ्याभोर पाण्यावर तरंगांमागून तरंग उठले.......पोटभर पाणी पिऊन होतांच त्याला थोडीशी मस्ती करण्याची लहर आलीसें वाटलें. त्याने शेजारच्या चिखलांत आपला उजवा पंजा उगारून मारला नि ती ओली माती तो मजेने इकडे तिकडे उडवूं लागला. मग त्याने थोडें थांबून एक झकासपैकी आळस दिला."

भयानक प्राण्याचें हें सुंदर वर्णन वाचतांना तो प्राणी आपल्या डोळ्यांसमोर साकार

---

पारध—[ लेखक : मधु मंगेश कर्णिक, साधना प्रकाशन, पुणें २; किं. २·५० ]

होऊं लागतो. पण या सुंदर वर्णनाबरोबरच गोळी लागल्यावर त्या प्राण्याच्या होणाऱ्या तडफडीचें वर्णनहि कर्णिक तितक्याच परिणामकारकतेने करतात.

शिकार-कथांमध्ये नाट्यपूर्ण प्रसंग व भयानक घटना यालाच प्राधान्य असतें. प्राणावर बेतलेले प्रसंग व त्यांतून अगदी थोडक्यांत दैवयोगाने झालेली सुटका यांवरच कथानक आधारलेलें असतें. तसें नसेल तर कथेंत विस्मय, उत्कंठा व भीति कुठून निर्माण होणार? कर्णिकांच्या अनेक कथांतून अशा भीतिदायक घटना आहेत. 'एका शिकंदर काडतुसाची गोष्ट', 'भैरवगडचा नरराक्षक' किंवा 'बिबट्याशीं झुंज' या कथा त्या दृष्टीने वाचण्यासारख्या आहेत.

या शिकारकथांतूनहि कांही ठिकाणीं कोमल भावनांचा साक्षात्कार होतो. 'घायाळ'-मध्ये गाभण असलेल्या हरिणीवर बंदूक न चालवणारें, 'गड आला पण सिंह गेला' मध्ये लाडक्या कुत्र्याच्या मृत्युमुळे हळहळणारें व 'भैरवगडचा नरराक्षस' मध्ये वाघाच्या तावडींत सापडलेल्या वृद्धाच्या आठवणीने विव्हळ होणारें शिकाऱ्याचें अंतःकरण पाहिलें म्हणजे त्या भयानक अंधकारांत दीप्तीचे किरण मधूनच चमकल्यासारखे वाटतात.

अशा आहेत कर्णिकांच्या शिकारकथा—धुंद करणाऱ्या, भयानक वातावरणांत नेणाऱ्या, हिंस्रपशूंच्या दर्शनाने अंगावर रोमांच उभे करणाऱ्या व त्याबरोबर शिकारीच्या कैफांत आपणांला सामावून घेणाऱ्या. या कथा वाचून भयानक जंगलांत बिबट्या वाघाची शिकार करण्यासाठी आपणहि कर्णिकांच्याबरोबर जावें असें क्षणभर वाचकाला वाटलें तर मला नवल दाटणार नाही. त्यांतच त्यांच्या कथांची यशस्विता आहे.

म. ना. अद्‌वंत

## उंबरठा

'माणदेशी माणसं' अजूनहि मनश्चक्षूंपुढून हाललेलीं नाहीत. कुशलतेने व्यक्तिचित्रें रेखाटणाऱ्या व्यंकटेश माडगूळकरांच्या 'उंबरठा' या नव्या कथासंग्रहांतील कांहीं वैशिष्ट्यें रसिकांचें लक्ष वेधून घेत आहेत. आशय आणि अभिव्यक्ति याबाबत स्वतःचें वेगळेपण कायम राखून त्यांची कक्षा विकसित झालेली दिसते. वाचकांचें केवळ मनोरंजन करून ती थांबत नाही. एका वेगळ्याच थाटांत जीवनाचा विविधरंगी चित्रपट दाखवीत वाचकांस ती विचार-प्रवण करते

आशयदृष्ट्या हें कथाविश्व समृद्ध असलें तरी बऱ्याच कथांचा मोहरा- ग्रामीण जीवन-चित्रणाकडेच अधिक झुकलेला दिसतो. 'गृहस्थ' ही कथा आकर्षक वाटते ती यापेक्षा असणाऱ्या तिच्या वेगळेपणामुळेच. समाजांतील महारमांग, शेतकरी यासारख्या कांहीं प्रमाणांत उपेक्षित वर्गांच्या केंद्रबिंदूभोंवती त्यांची कथा फिरते आणि वर्तुळ पूर्ण होतें. हीं उपेक्षित माणसें, तीव्र जीवनकलह, त्यांत त्यांची अगतिकता, दारिद्र्य अन् त्यांतूनहि जीवन जगण्याचा, तेंहि अब्रूने, इज्जतीनें त्यांचा दुर्दम्य आशावाद या आशयानेच माडगूळकरांची कथा जिवंत, रसरशीत झाली आहे.

कथानकापेक्षा व्यक्तीच प्रधान असणारी त्यांची कथा अधिक जीवनदर्शी वाटते ती तींत 'माणसं' आहेत, ठोकळेबाज पात्रं नाहीत म्हणूनच. जीवनलढ्यास जिद्दीने तोंड देऊन

उंबरठा—[ लेखक : व्यंकटेश माडगूळकर, मौज प्रकाशन, मुंबई ४; किं. ५ रु. ]

श्रद्धा, प्रेम, माणुसकी इ. जीवनमूल्यांची जपणूक करणारीं हीं माणसें या कथा आपल्याच जीवनाबद्दल बोलतात याबद्दल शंका राहूं देत नाहीत. जीवाचा आटापिटा करून वेळेवर जुपी करण्यासाठी धडपडणारा नामा, पिण्याच्या पाण्यासाठी विहीर खणण्यासाठी एकदिलाने झटणारा महारमांगांचा वर्ग, दुबळेपणाच्या आरोपाने संतापून जाऊन पत्नीवर वाईट नजर ठेवणाऱ्या भगवंतरावाचा खून करणरा नामू सातपुते, सरळ मार्गाने हवें तें मिळेना तेव्हा आडमार्गाचा अवलंब करण्याइतपत मनाची तयारी झालेली विठाबाई, दारिद्र्यावस्थेंतहि तुरुंगांतील सोयी नाकारून अब्रूसाठी बाळंतपणांतील हालांची पर्वा न करणारी लाडाबाई, हीं व अशींच इतरहि माणसें ह्या जगांतहि पाहायला मिळतात ना? तुमच्या-आमच्याच या प्रतिमा नव्हेत का?

मानवी स्वभावाचे असे कितीतरी नमुने या कथाविश्वांत भेटतात. आपली प्रतिष्ठा, धन, शाश्वती विसरून जाऊन असें सर्वस्पर्शी जीवनदर्शन घडविणें माडगूळकरांसारख्या कलावंतालाच शक्य आहे. समाजांतील जीवनाचा हा दुर्लक्षित भाग जणू ते स्वतः जगतात व जगत असतां येणारे अनुभव कथारूपाने बोलके करून जातात.

कथा वाचून झाल्यावर मनावर ठसा उमटलेला असतो तो ह्या वेगवेगळया व्यक्तींचा–त्यांच्या वांट्यास आलेल्या जीवनाचा. त्याच ठशामागे लपलें असतें लेखकाचें अनुभवसंपन्न व्यक्तिमत्त्व, सखोल जीवनचिंतन व मानवी स्वभावाचें कोनेकोपरे टिपून घेणारें सूक्ष्म अवलोकन. ' दुबळा ' नामू सातपुते, घरापाठीमागची लोभा, ' उंबरठा ' मधील विठाबाई, यांचें जीवन अंतरंगांत शिरून पाहतां येतें. त्यांत कांहीं अंशी तोचतोपणा, मर्यादा जाणवते. नकळत आशयाचा सांचा तर नाही ना निर्माण झाला अशी शंका डोकावते. जीवनाचा विशिष्टच भाग रंगविल्याने ठरीव रिंगणांत कथा गिरक्या घेते असा भास होतो. परंतु गवयाने त्याच त्या ताना आळवून एखादी चीज रंगवावी त्याचप्रमाणे जीवनाच्या विविध छटा रंगविणारा हा तोचतोपणा परिणामकारकतेस उपकारक ठरला आहे. 'लढत' किंवा 'जंगल' यासारख्या कथा आशयदृष्टया नावीन्यपूर्ण, तर ' गृहस्थ ' ही कथा रुचिपालट म्हणून आस्वादितां येते.

या आशयसंपन्न कथेचें बहिरंग पाहूं जातां त्यांतहि वेगळेंपण जाणवतें. प्रथमपासून अखेरपर्यंत उत्कंठा वाढविणारी निवेदनपद्धति, वेचक घटनांची कलात्मक गुंफण करण्याची रचना-पद्धति येथेहि दिसते. कथानकापेक्षा व्यक्तींना, त्यांच्या भावविश्वाला महत्त्व असल्याने स्वभाव-रेखन व मनोविश्लेषण यांना प्राधान्य यावें हें ओघानेच आलें. त्या त्या व्यक्तीच्या मनांतील भावना पिंजून पिंजून फुलविण्याची पद्धति अभिनव नसली तरी यशस्वीपणें हाताळली आहे. पात्रांच्या स्वभावाच्या कडा न् कडा तपशील देऊन स्वच्छपणें उजेडांत आणल्या आहेत. उत्कट-पणें भावनांचें दर्शन ते घडवितात. अशा वेळीं निरीक्षणांतून न सुटलेला सूक्ष्मातिसूक्ष्म तपशील पोषक ठरला आहे. बोलकीं निसर्ग-वर्णनें हा त्याचाच एक भाग म्हणतां येईल. याच तपशील-टिप्पण्यांतून वातावरण-निर्मितीच्या घटकाचें कार्य साधलें आहे. आविष्कारांत लेखकाच्या व्यक्तित्वाचाच दिलखुलासपणा व मनमोकळेपणा यावा हें अपरिहार्य नाही का? वर्ण्यविषयानुरूप भाषाशैली हाहि ह्या कथांचा विशेष होय.

ग्रामीण भाषेंतील पारिभाषिक शब्द सहजपणें कथेंत येतात. ' नाही नाही ' या कथेंतील चोराच्या मनांतील आंदोलनें व अखेरचें परिवर्तन जितकें स्वाभाविक तितकेंच मानवी स्वभावा-वर प्रकाश टाकणारें आहे. ' उंबरठां 'तील विठाबाईमधील अंतर्बाह्य बदल–मानसिक बदला-

बद्दलचे लेखकाचे अंदाज अखेर हवें तें सरळ मार्गानें मिळेना, तेव्हा पाऊल वाकडें पडलें तरी मन तयार ठेवणारी विठाबाई—'दरवाजा मोकळा आहे' ह्यांतील हा गर्भित अर्थ हृदयस्पर्शी तितकाच विचारास चालना देणारा आहे. व्यक्तिचित्रणांतील यश 'माणदेशी माणसं'द्वारा पूर्वीच सिद्ध झालें आहे. त्या मानाने या कथांतून फारसा प्रगतीचा टप्पा गाठला असें म्हणतां येत नाही. व्यक्तीच्या भावनांचे पदर उलगडून दाखवीत असतां स्वाभाविकपणें कथानक गति घेतें. उघडपणें भूमिका प्रचारकाची नसली तरी कथेची घडणच अशी की, अखेरीस वाचक अंतर्मुख व्हावा. समाजांतील विशिष्ट जीवनस्तरच स्पर्शून आशय-आविष्काराचा कांहीसा तोचतोपणा स्वीकारण्यामागे ही भूमिका असावी.

ठसठशीत व वास्तव व्यक्तिचित्रांनी सजीव वाटणाऱ्या माडगूळकरांच्या कथांचें स्वरूप स्थूलमानाने हें असें आहे. आशयांत कांहीं अंशीं येणारीं आवर्तनें मान्य करूनहि असें म्हणावेंसें वाटतें की, मानवी भाव-भावनांच्या गुंतागुंत झालेल्या जाळ्याचा एकेक धागा अत्यंत नाजूकपणें उलगडून दाखविणाऱ्या या त्यांच्या कथा स्वतःचें वैशिष्ट्य बाळगून आहेत. मानवी स्वभावांतील प्रेम, लोभ, वासना, आसक्ति, हेवेदावे, नीतिबाह्यता इत्यादींचे सूक्ष्म कंगोरे त्यांच्या कथांतून नवी झिलई मिळून चमकूं लागतात—त्यांतच त्यांच्या कथेचें यश आहे.

सुलभा आरस

## मराठी कथा १९५९ व मराठी कथा १९६०

दरवर्षी मराठी साहित्यांत कादंबरी, नाटक, काव्य इत्यादि वाङ्मयप्रकारांपेक्षा तुलनेने कितीतरी पट अधिक कथावाङ्मय निर्माण होत आहे. कथासरितेचें हें पात्र नुसतेंच रुंदावलें आहे की पसरटपणासह त्याला खोलीहि आहे? ती सांकेतिक आवर्तांत संथपणें स्थिरावली आहे की नवनव्या प्रवाहांनी तिचें अंतरंगहि ढवळून निघालें आहे? तिच्या विस्तारांत विकास-बीजेंहि रुजलेलीं आहेत का? नवे प्रयोग, नवीं वळणें तींत दिसतात का? इत्यादि प्रश्नांचीं उत्तरें शोधणाऱ्या जिज्ञासु वाचकास 'अरविंद गोखले' यांचे "मराठी कथा १९५९ व मराठी कथा १९६०" हे दोन संयोजित कथासंग्रह निश्चितच मार्गदर्शक आणि उपयुक्त ठरतील. गेल्या दोन वर्षांतील कथासंभारांतून चोखंदळपणें केलेली ही उत्कृष्ट वीस कथांची निवड अचूक व मार्मिक असून या कथांचें महत्त्व दुहेरी आहे. स्वतः गोखले म्हणतात, तद्वत् त्यावरून प्रत्येक कथेचें वेगळेंपण अजमावितां येतें. तसेंच तुलनात्मक अभ्यासाने त्यांची प्रतवारी ठरविणें सुलभ जातें.

कथावस्तु आणि घाट याबाबत विविधता व वैचित्र्य येथे दिसतें. जीवनानुभवाचीं भव्य चित्रें पाहावयास मिळतात. मानवी स्वभावाचे असंख्य नमुने मनःसंपुटांत साठवितां येतात. कथाक्षेत्रांतील अभिनव प्रयोगशीलतेची ओळख होते. जी. ए. कुलकर्णी यांची 'माणूस नांवाचें बेट' ही कथा त्यांतील मनोविश्लेषणामुळे लक्षांत राहते. दत्तूचे स्वानुभव, त्याला दिसलेलें जग, तज्जन्य त्याच्या मनांतील विचारसंघर्ष, वांझोटे प्रश्न यांनी त्याच्याप्रमाणे वाचकहि अस्वस्थ नि अंतर्मुख बनतो. 'कॅक्टस'मधील पिता-पुत्रांच्या आयुष्यांत एकाच वेळीं घडून आलेलें प्रीतिभावनेचें साफल्य-वैफल्य वेगळीच भावछटा रंगवून जातें. 'चंद्र सावली

---

मराठी कथा १९५९ व मराठी कथा १९६०—[संयोजक : अरविंद गोखले, कॉण्टिनेण्टल प्रकाशन, पुणें २; किंमत प्रत्येकी ३॥ रु. ]

कोरतो ' ही रेगे यांची आविष्कारदृष्ट्या दुर्बोधतेकडे झुकणारी व आशयाला कांहीसा अश्लील-तेचा वास असणारी कथा नवकथेचा प्रातिनिधिक नमुना तर नव्हे? आईस्क्रुट खाणारें ऊन, सरड्याशीं होणार असलेलें त्याचें लग्न, नीराक्काच्या चोळीआड दडलेले दोन थंडगार चंद्र इत्यादि अश्लील प्रतिमा अशा शंकेस साद घालतात.

शंकर पाटील व उद्धव ज. शेळके यांच्या कथांतून ग्रामीण जीवनचित्रांचा जिवंत झरा वाहतांना दिसतो. गुडघ्याला बाशिंग बांधणाऱ्या नवरदेवाप्रमाणे मुलीच्या लग्नाबाबत उतावळा असणारा बाप आणि लग्न जमावें म्हणून तिचें वय विश्वास न बसावा इतकें वाढवून सांगून ' कर्जमुक्त ' होण्याचा त्याचा ' आटापिटा ' रंगवितांना शेळक्यांच्या लेखनाला विनोदाची धार येते. ' सय ' मधील शिवाला भुजंगदर्शन होणें, त्या चमत्कारावर श्रद्धा ठेवल्याने त्याच्या जिवाची घालमेल होणें, हा प्रसंग देखील ग्रामीण जीवनाचीच एक वास्तव बाजू प्रकाशांत आणणारा आहे, तर ' जत्री ', ' जिद्द ', ' विरंगुळा ' यासारख्या कथांतून कोरलेले अनुभव वेगवेगळ्या पातळीवरचे आहेत. चटकदार व रसाळ कथानक हा त्यांचा विशेष होय. ' चंद्र माझा सखा ' किंवा ' आमोद सुनासि आले ' या कथा काव्यमय वृत्तीचा विलास दाखवितात.

व्यक्तिप्रधान कथा वाचकांस गुप्त ठेवा गवसल्याचा आनंद देतात. ' वारसा ' मधील सावित्रीआक्का, श्रीमंत पण निपुत्रिक ' नानूमामा ', ' जत्री ' आणणारा केशव व त्याचे काका, ' जिद्द ' मधील स्वाभिमानी अण्णा व त्यांचा तितकाच हट्टी मुलगा, वर्तमान विसरून इतिहासालाच जिवंत ठेवणारा प्रेमळ ' हरितात्या ', हीं व्यक्तिचित्रें व त्यांच्याभोवती गुंफलेले जीवनानुभव एकापेक्षा एक वास्तव, हृदयस्पर्शी व चिंतनाचा विषय ठरणारे आहेत. चिरस्मरणीय, जिवंत तितकेच ठसठशीत ' हरितात्या ' व ' अंतू बरवा ' पु. ल. देशपांडेच उभे करूं जाणतात. उठावदार कलात्मक व्यक्तिचित्रें हा त्यांचा खास विशेष होय. अश्रद्ध, मतलबी, फसव्या जगावर चिडून जाऊन विठ्ठलचरणीं सदासाठी लीन झालेला ग. दि. माडगूळकरांचा ' नागूदेव 'हि याच कोटींतला म्हणायचा.

उत्कृष्ट व्यक्तिचित्र-निर्माते पु. ल. देशपांडे, मनोविश्लेषणात्मक कथारचनेच्या नव्या प्रयोगांत यशस्वीपणें अवगाहन करणारे जी. ए. कुलकर्णी, काव्यात्मवृत्तीनें कथा रंगविणारे मोकाशी, नाजूकपणें भाववृत्तींचा गोफ उकलणारे अरविंद गोखले, ग्रामीण जीवनाच्या गाभाऱ्यांत नेऊन सोडणारे शेळके व पाटील, — सगळेच कथाकार आपापल्या कथांत लक्षणीय वेगळेंपण आणि स्वतंत्र व्यक्तिमत्त्व बाळगून आहेत. कथेच्या अंतर्बाह्य स्वरूपांतील भिन्नत्वाच्या मुळाशीं कथाकारांचें हें प्रकृतिभिन्नत्व आहे.

या कथांचा सामग्र्यानें विचार केल्यास जाणवतें तें हें की, त्यांत मिस्किल विनोद, तसें गांभीर्यहि आहे. सकस व सखोल अनुभूति आहे. कोमल भावविश्वाचें इन्द्रधनुष्य फुललेलें दिसतें. भावस्पर्शी व परिणामकारक कथानकांच्या जोडीला भिन्न भिन्न अनुभवांच्या मुशींतून ओतलेलीं रसरशीत व्यक्तिचित्रेंहि आहेत. एक व्यक्ति दुसऱ्या व्यक्तीसारखी नाही. बघतां बघतां या व्यक्ति आपल्यासमोर जीवन जगत असल्याचा भास व्हावा इतका जिवंतपणा त्यांच्यांत भरलाय्. व्यक्तिरेखाटनाचा उत्कर्षबिंदु याहून वेगळया तो काय असणार? कथेंत कांहीशी पारंपरिकता आहे पण तीपेक्षा कितीतरी जास्त नावीन्य आहे — रचनेचें अन् विषयाचेंहि! त्यांच्या वैचित्र्यांतूनच सौंदर्य उमललें आहे. मनोरंजनासह उद्बोधनाचें सामर्थ्य आहे. वाचकांस डोळस व जीवनाभिमुख करण्याची जादू आहे. जीवनांतील सत्य, शिव,

अनुक्रमणिका

सौंदर्य यांचा साक्षात्कार आहे. गाभुळलेल्या चिंचेची आंबटगोड संमिश्र चव याहून निराळी नसते यांतच सर्वकांही आलें.

संज्ञाप्रवाह, मनोविश्लेषण, संभ्रमांत पाडणारी नवी अभिव्यक्तिपद्धति, नवे कल्पनातरंग स्वतः न समावून घेत कथासरिता पुढे धांवत आहे. व्यक्तिमनाचे पापुद्रे अन् चित्रविचित्र प्रश्नवलयांनी गोंधळलेलें त्याचें जीवन यांचा तीक्ष्ण नजरेनें वेध घेण्याची महत्त्वाकांक्षा तिने नव्याने उराशीं बाळगलेली दिसते. व्यक्तिमनाचा पाठलाग करणाऱ्या कथेचा वेग भरधाव नसला तरी रेंगाळणारा खास नाही, याची कल्पना वरील कथासंग्रह वाचकांस देऊं शकतात. हेंच अरविंद गोखले यांच्या संयोजनाचें सामर्थ्य अन् हेंच साफल्यहि — !

सुलभा आरस

# चरित्र—आत्मचरित्र

## चित्र आणि चरित्र

गेल्या वर्षीच्या कांही मासिकांतून अगदींच नवीन वाटावा असा मजकूर अधूनमधून प्रकाशित होत होता. त्या लेखनाची धाटणी वेगळी होती. विषय निराळा होता. आणि आशय वाचणाऱ्यांच्या मनाला धक्का देत उत्सुकतेनें पुढे सरकणारा होता. शिवाय त्या मजकुराच्या शेवटीं बाबूराव पेंढारकरांचें व त्यांच्या ‘ चित्र आणि चरित्र ’ या आगामी ग्रंथाचें नांवहि नोंदलें जात होतें. त्यामुळे तेव्हापासूनच या ‘ चित्र आणि चरित्र ’ ग्रंथाच्या बाबतींत रसिक मराठी मनांत कुतूहल निर्माण झालेलें होतें. त्याचबरोबर नटश्रेष्ठ अशा एका कलावंताच्यासंबंधी उराशीं बाळगून ठेवलेल्या अनेक बऱ्यावाईट समजांचे व गैरसमजांचे गाठोडें मूळची दिशाभूल सोडून बाजूला होत होतें. एवढेंच नाहीतर बाबूराव पेंढारकरांना ज्यांनी प्रत्यक्ष पाहिलें होतें व ज्यांचा त्यांच्याशीं थोडाफार परिचय झाला होता, अशा लोकांना एरव्ही एवढा अबोल वाटणारा माणूस ह्या पुस्तकाच्या कारणाने एवढा बोलका कसा होऊं शकला याचेंहि नवल वाटत होतें.

आणि म्हणूनच ह्या ग्रंथाच्या वाचनाचा प्रारंभ करतांना माझ्यादेखील मनाची कांहीशी अशीच अवस्था होती. पण मग सुप्रसिद्ध फ्रेंच लेखक रूसो यांनी म्हटल्याप्रमाणे आपल्या जीवनाची परमेश्वराला सांगितलेली जबानी ह्या आत्मचरित्राच्या कारणाने बाबूरावांनी येथे दिलेली असली पाहिजे, ह्या कल्पनेनेच मीं या ग्रंथाचीं पानें वाचलीं.

आत्मचरित्र यशस्वी व्हावयाचें म्हणजे सत्यकथनाबरोबरच स्वभावलेखनहि महत्त्वाचें असतें. आपल्या स्वतःबरोबरच आपल्याभोवती असणाऱ्या आप्तेष्टांचा व इष्टमित्रांचा स्वभावहि प्रसंगानुरूप कसकसा प्रकट होत जातो, हें मोठ्या कौशल्याने आत्मचरित्रांत सांगावें लागतें. त्या दृष्टीने अनेक बारीकसारीक तपशिलांसह बाबूरावांनी या ग्रंथांत निर्माण केलेली आपल्या पूज्य मातोश्रींची व आपली स्वतःची स्वभावरेखा उल्लेखनीय आहे.

या ग्रंथाच्या १८४ पानावर टांगेवाल्याजवळ एक हजाराच्या नोटेची मोड नसल्याची बाबूरावांना झालेली जाणीव आणि “ मी तमाशाला गेलों की, बैठक बहुधा सकाळपर्यंत चालू

चित्र आणि चरित्र—[ लेखक : बाबूराव पेंढारकर, व्हीनस प्रकाशन, पुणें २; किं. १० रु. ]

राही " हा त्यांनी १८५ पानावर आपल्या रसिकतेचा दिलेला जबाब, या दोन्हीहि गोष्टी त्यांच्या कलावंत मनाच्या साक्षी देतात. त्याचप्रमाणे एकदा सोडून तीनदा केवळ आईच्या इच्छेसाठी आई सांगेल त्या मुलीशीं लग्न करून संसार मांडणारे बाबूराव आणि जीवनांत आलेल्या सिनेमा-नाटक व्यवसायांतील इतर स्त्री-कलावंतांच्या संगतींत रंगणारे बाबूराव या दोन्ही भूमिका त्यांनी एवढ्या मोकळ्या मनाने येथे सांगितलेल्या आहेत की, ह्या माणसाबद्दल वाचकाच्या मनांत आदर निर्माण व्हावा. मनांत येईल तें बाबूरावांनी आठवेल त्या रीतीने व सडेतोडपणाने येथे सांगितल्याकारणाने त्यांनी रंगविलेलीं या ग्रंथांतील अनेक स्मृतिचित्रें मोठीं हृद्य झालेलीं आहेत.

आमचा महाराष्ट्र म्हणजे आम्हां मराठ्यांची 'मायभूमि.' आणि आमचें कोल्हापूर म्हणजे आमच्या कलावंतांची कर्मभूमि. त्या दृष्टीने ह्या मंगल निवासस्थानीं नांदतांना आपली महाराष्ट्रीय मनोवृत्ति कायम टिकवून स्वाभिमानाने जीवन जगणारे बाबूराव ह्या ग्रंथाच्या पानापानावर दिसून येतात. त्यांच्या जीवनाला शेकडो प्रसंगांशीं टक्कर देत दूर पळणाऱ्या यशाला गवसणी घालतांना आलेल्या अनेक अनुभवांची समृद्धताहि या ग्रंथांत पदोपदीं पाहावयास सापडते; आणि त्यामुळे एक गोष्ट ठळकपणें लक्षांत येते की, खऱ्या कलावंताजवळ आपल्या कलेशीं असणारें इमान किती अपूर्वाईचें असतें तें पाहावें म्हणून तरी हा ग्रंथ एक वेळ वाचलाच पाहिजे असा मोह वाचकाला व्हावा.

" मला एक छोटंसं देवघर बांधून देरं बाबू ! " अशी अपेक्षा प्रकट करणाऱ्या व हरघडी आपल्या मुलाच्या उत्कर्षासाठी प्राण टाकणाऱ्या आपल्या आईची व्यक्तिरेखा बाबूरावांनी या ग्रंथांत एवढी चांगली चित्रित केली आहे की, ती वाचतांना " Personality is to a man, what perfume is to a flower " असा विचार आपल्या मनांत सहज डोकावून जावा.

चित्रपट-सृष्टि ही काय चीज आहे आणि त्या सृष्टींत वावरणारे सारे कलावंत व निर्माते हीं माणसेंहि कसलीं असतात याची बरीचशी कल्पना या ग्रंथामुळे सामान्य वाचकाला येते. त्यामुळे बाबूरावांनी असल्या ह्या विचित्र सामन्यांत आपल्या आयुष्याची ऐन उमेद कशी घालविली आणि जयपुरी थाटाचा बंगला बांधून झाला नाही तोंच तो जप्त केल्याची नोटीस मिळाल्यावर मनाला पोचलेला धक्काहि कसा सहन केला, याचें नवल वाटूं लागतें; आणि मग एखादे वेळीं असल्या लफड्यांत आपण सापडलों नाही तें बरें झालें, असाहि विचार मनांत डोकावून जातो एवढें हें लेखन प्रभावी झालेलें आहे.

'चित्र आणि चरित्र'चीं हीं वैशिष्ट्यें नजरेखालीं घालतांना या ग्रंथांत दिलेलीं अनेक छायाचित्रें व शेवटीं दिलेला महाराष्ट्र-चित्रसृष्टीचा वाढता वृक्ष ह्या गोष्टीहि ठळकपणें नजरेंत भरतात. त्याचप्रमाणे शेवटीं जोडलेला जीवनपटहि या ग्रंथाच्या अंतरंगाच्या तपासणीसाठी चांगलाच मार्गदर्शक ठरणारा असा आहे.

परंतु या ग्रंथाच्या बाबतींत एक गोष्ट मात्र मला ठळकपणाने खटकली ती अशी की, मा. विनायक यांच्यासंबंधीची माहिती सांगतांना आलेला विस्कळीतपणा ही व 'मी–सुधाकर' या प्रकरणांत निर्माण झालेली विसंगति. कदाचित् जें सुचत गेलें तसें सांगत गेलों अशी बाबूरावांनी या ग्रंथ-निर्मितीची दिलेली कारणमीमांसाहि या दोषाला कारणीभूत असणें शक्य आहे. तरीपण बाबूरावांनी इतर मजकुराप्रमाणे हा भागहि काळजीपूर्वक तपासून पाहायला हवा होता असें वाटतें.

आत्मचरित्रांत लेखकाचें व्यक्तित्व नीटपणें प्रकट होऊं शकलें नाही याची संपादकांनाहि जाणीव असल्यामुळे व लेखकाच्या चरित्राला पूर्णता आणण्याच्या दृष्टीने त्यांनी 'शेवटचें पान' या सदराखाली चाळीसहून अधिक पृष्ठांचा लिहिलेला मजकूर त्यांतील जिव्हाळ्यामुळे वाचनीय झाला आहे. कै. अळतेकरांच्या व्यक्तित्वाचे निरनिराळे पैलू येथेच वास्तविकपणें वाचकांच्या नजरेंत भरतात. परिशिष्ट दोनमधील इंग्रजी पत्रव्यवहार मात्र फारच औपचारिक स्वरूपाचा आहे. परिशिष्ट एकमधील कै. चंद्रशेखरांचें कै. अळतेकरांना आलेलें एक पत्र दिलें आहे. तें अनेक कारणांसाठी महत्त्वाचें आहे. लेखक आणि प्रकाशक यासंबंधांत या पत्रांत प्रगट झालेली परवड खूपच बोलकी आहे. कै. अळतेकरांचा निवडक पत्रव्यवहार - संपादकांनी प्रसिद्ध केल्यास तो उपयुक्त ठरण्याचा संभव आहे असें या संदर्भांत सुचवावेंसें वाटतें.

गो. म. कुलकर्णी

## शांतिनिकेतन

कविश्रेष्ठ रवीन्द्रांच्या सुरस व सुभग वाङ्मयाची ओळख व्हावी व त्यांच्या अष्टपैलू कर्तृत्वाची पार्श्वभूमि समजली गेली तर वाङ्मयाच्या रसास्वादास फार मदत होईल, ही भूमिका लक्षांत ठेवून या पुस्तकाची रचना करण्यांत आली आहे. या चरित्रग्रंथांत आरंभीं रवीन्द्रांची जीवनगाथा समरसतेने वर्णिली आहे. रवीन्द्रांच्या मानसिक व शारीरिक शक्तींची जोपासना जमीनदार घराण्यांत कशी आस्थेने करण्यांत आली तें संक्षेपाने दिलें आहे. टागोर-घराण्यांत चालू असलेला इंग्रजीचा अभ्यास व रवीन्द्रांचें इंग्लंडांतील वास्तव्य यांचा विशेष परिणाम रवीन्द्रांच्या मनावर कसा झाला तेंहि विवरून सांगितलें आहे.

रवीन्द्रनाथ टागोर यांच्या अलौकिक व्यक्तिमत्त्वाविषयी व थोर साहित्य-संपदेविषयी रसिकांना फार सुंदर व व्यवस्थित जाण श्री. तळवलकर यांनी करून दिली आहे. थोडक्यांत, परंतु मर्मदर्शी व परिचायक पद्धतीने त्यांच्या लेखणीने हें दुष्ट काम केलें आहे. रवीन्द्रांच्या-विषयीच्या धूसर कल्पना दूर होऊन, त्यांचें खरें व विविधांगी कार्य ध्यानांत येण्यास या पुस्तकाचा फार उपयोग होईल, चरित्रनायकावर भक्तिपूर्ण निष्ठा व डोळस प्रेम असलें म्हणजे तें चरित्र किती सहजसुंदर व संपन्न उतरतें याचा 'शांतिनिकेतन' हा एक पुरावाच आहे.

कवि म्हणून रवीन्द्रनाथ विशेष विख्यात. तेव्हा त्यांच्या कवित्वासंबंधीचें विशेष विवेचन या ग्रंथांत साहजिकच अपेक्षिलें जाणार. रवीन्द्रांनी सत्य, शिव व सौंदर्य यांची उपासना काव्यद्वारा कशी केली हें तळवलकरांनी अचूक सांगितलें आहे. प्राचीन संतकवींचा वारसा वेगळ्या पद्धतीने रवीन्द्रांनी कसा पुढे चालविला, हेंहि तळवलकर आवर्जून सांगतात. काव्य हें अंतरात्म्याच्या प्रगतीचें साधन आहे हें रवीन्द्रांचें एक आवडतें तत्त्व होतें; व त्याच दृष्टिकोणांतून तळवलकरांनी रवीन्द्रकाव्याचा आशय विवेचिला आहे. रवीन्द्रांची कविता गूढ आहे पण दुर्बोध नाही, हें तळवलकरांचें म्हणणें यथार्थच वाटतें. या काव्यांतील आत्मनिष्ठा व विश्वप्रेम यांचें अचूक नातें सूचित करून या काव्याला 'परतत्त्वस्पर्श' झाला असल्याने त्याला जरामरणाचें भय राहिलेलें नाही अशी ग्वाही लेखकांनी दिली आहे, तिच्याशीं रसिक सहमतच होतील.

---

**शांतिनिकेतन**—[लेखक : श्री. गोपीनाथ तळवलकर, प्रकाशक : कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; किं. २ रु.]

आशिया खंडांतील कवींपैकी उमरखय्यामच्या ' रुबाया ' नंतर ' गीताञ्जलीला 'च पाश्चात्त्यांनी फार मानलें हें श्री तळवलकर सांगतात. या दोन थोर कवींच्या काव्यप्रेरणांची व तत्त्वज्ञानाची थोडी सविस्तर तुलना येथे मांडली असती तर ती हवीच होती असें वाटतें. ' गीताञ्जली 'मध्ये भक्तीला कवीने उत्कृष्ट काव्यरूप कसें दिलें आहे याचें सुंदर विवेचन या ग्रंथांत आढळतें. तसेंच, गीताञ्जली म्हणजे केवळ प्राचीन संतकवींचे पडसाद नव्हेत तर तिच्यांत साक्षात्काराची ओढ आहे तशीच थोर काव्यात्मता आणि जगावरील अनुरक्तताहि आहे, हा तिचा एक विशेष चरित्रकाराने स्पष्ट केला आहे.

शिशुजीवनासंबंधी अतिशय हृदयंगम काव्य रवीन्द्रांनी रचिलें या मागची पार्श्वभूमि तळवलकर उलगडून दाखवितात व त्या शिशुसृष्टीचेंहि ओझरतें, सटीप दर्शन घडवितात. तें वाचनीय आहे. रवीन्द्रांचें कथावाङ्मय कसें समृद्ध आहे, हें त्यांतील जीवनसूत्रें स्पष्ट करीत लेखक दर्शवितात तें वाचून समाधान वाटतें.

रवीन्द्रांच्या कादंबऱ्यांविषयी (विशेषतः त्यांच्या सापेक्षतया कमी यशाविषयी) केलेलें विवेचन पटण्याजोगें आहे. परंतु या कादंबऱ्यांत ठायीं ठायीं दिसून येणारें एका महाकवीचें व्यक्तिमत्त्व, व अंतरात्म्याच्या छायाप्रकाशांतील वाटचालीची नोंद करण्याची त्यांची अलौकिक शक्ति याविषयी अधिक विवेचन हवें होतें.

' शांतिनिकेतन ' या प्रकरणांत रवीन्द्रांच्या शिक्षणविषयक प्रयत्नांची व विश्वविख्यात कार्याची ओळख करून देण्यांत आली आहे. रवीन्द्रनाथांच्या जीविताविषयी ' पर्यटन ' या प्रकरणांतहि कांही ऊहापोह झाला आहे. परदेशच्या दौऱ्यांत जडवादी व विज्ञानवादी परकीयांना आपला सात्त्विकतेचा संदेश रवीन्द्रांनी निर्भयपणें कसा पोचविला व साम्राज्यवादी विरोधाच्या क्षोभाला कसें तोंड दिलें हेंहि प्रामुख्याने रेखाटलें आहे. मानवतेचा कळवळा मनांत बाळगून भारतीय संस्कृतीची ज्योत जेथे तेथे तेवत ठेवूं पाहणारा एक महात्मा म्हणजे रवीन्द्रनाथ, हें सत्य त्या पुस्तकाच्या वाचनाने मनावर दृढपणें ठसावें.

रवीन्द्रांनाहि जीवनांत कौटुंबिक आपत्तींना तोंड द्यावेंच लागलें, पण त्या आपत्तींनी अश्रद्ध न बनतां ते अन्तर्मुख बनत गेले. रवीन्द्र आपल्यांतून गेल्याला आता वीस वर्षें होत आहेत. एवढ्या कालावधीनंतर आता त्यांचें विभूतिमत्त्व निराग्रहीपणें व रसिकपणें अवलोकणें आवश्यक आहे. हें इष्ट कार्य करून रवीन्द्रांचें विभूतिमत्त्व तळवलकरांनी विशद करून सांगितलें हें एक सत्कार्यच त्यांनी पार पाडलें असें म्हटलें पाहिजे. श्री. राधाकृष्णन् म्हणतात त्याप्रमाणे—आजच्या बदलत्या विकट परिस्थितींत भारतीय तरुणांना सांत्वनाबरोबर स्फूर्ति देण्याचें कार्य रवीन्द्रवाङ्मय व रवीन्द्रांचें जीवन करूं शकेल. म्हणूनच ' शांतिनिकेतन 'सारख्या चरित्रग्रंथाचें हार्दिक स्वागत केलें पाहिजे.

रवीन्द्रांच्या कांही काव्यपंक्ति व वचनें यांची पखरण पुस्तकभर आढळते. रवीन्द्रांच्या दिल्या आहेत त्याहून आणखी कांही कविता (मूळ बंगालींत व मराठी भाषांतरासह) दिल्या असत्या तर रसिक वाचकांना सहजीं मूळ रवीन्द्र-वाङ्मयाची थोडी कल्पना आली असती. स्नेही-सुहृदांच्या रवीन्द्रांविषयीच्या निवडक आठवणींचीहि उणीव भासते. आठवणी म्हणजे व्यक्तिमत्त्वाचें अचूक दर्शन घडविणारे प्रकाशझोतच असतात. त्या कांही हव्या होत्या. तसेच मराठींत आलेल्या रवीन्द्रसाहित्याची एक सूचि शेवटीं जोडली गेली असती तर तीहि उपयुक्त झाली असती.

यथार्थगुणदर्शनरीतीने चरित्र लिहिण्याची पद्धति मागे पडूं लागली असतां तशा पद्धतीचें, जीवनकार्याचा यथार्थ परिचय करून देणारें एक सुरेख चरित्र सादर केल्याबद्दल लेखकास धन्यवाद.

वि. म. कुलकर्णी

# इतिहास

## मराठेकालीन समाजदर्शन

भारत इतिहास संशोधक मंडळांतील निवृत्त संशोधक श्री. शं. ना. जोशी यांच्या अनेक ऐतिहासिक विषयांवरील लेखांचा संग्रह अनाथ विद्यार्थी गृहानें गतवर्षी प्रसिद्ध केला. श्री. शंकररावांचें वय सत्तर वर्षांचें झालें, तेव्हां त्यांचा सत्कार करावा असें त्यांच्या चहात्यांच्या मनांत आलें. एक सत्कार-समिति निर्माण झाली व तिनें श्री. शंकररावांच्या निवडक लेखांचा संग्रह प्रसिद्ध करण्याचें ठरविलें. संग्रहास 'मराठेकालीन समाजदर्शन' असें अन्वर्थक नांव देण्यांत आलें. तोच हा ग्रंथ होय. प्रस्तुत संग्रहास आरंभीं श्री. शंकररावांचें स्फूर्तिदायी चरित्र जोडण्यांत आलें असून, त्यांच्या लेखांचें सार इंग्रजींतून देण्यांत आलें आहे.

महाराष्ट्र प्रदेशांतील दिवाणसत्ता, गोतसत्ता, धर्मसत्ता व व्यापारी सत्ता यांचा विचार आरंभींच मांडला आहे. या सत्ता एकमेकींशीं संबद्ध असल्या, तरी त्यांना स्वतंत्र अस्तित्व आणि महत्त्व होतें; आपल्या अधिकारांवर इतर सत्तांचें आक्रमण होऊं नये, म्हणून यांतील प्रत्येक सत्ता जपत असे हें सांगितल्यावर लेखक 'पाटीलकी' या विषयाकडे वळले आहेत. शिवकालीन पाटीलकी वतन, पाटील वतनाची विक्री हे दोन लेख पाटीलकीसंबंधी असून त्यांतून पाटीलकीची परंपरा व इतिहास ग्रथित झाला आहे. चौधुला, देशमुख या वतनदारांबद्दलहि दोन स्वतंत्र लेख लिहिल्यावर लेखकांनी गांवकारभार स्पष्ट करण्यासाठी कांही लेख लिहिले आहेत (ले. ३, ११, १४). मराठेशाहींतील टपालाच्या पद्धतीवर दोन लेख असून पेशवे-कालीन वकील, मसाला या महत्त्वाच्या विषयांवर दोन अभ्यासपूर्ण लेख लिहिले आहेत. मराठ्यांचा सामाजिक इतिहास स्पष्ट करण्यासाठी कांही लेख लिहिले असून त्यांतून ज्ञातिनियम, विवाह, प्रायश्चित्तें, न्यायनिवाडे, मराठे व कुणबी यांतील भेद, महारांचे लग्न–संस्कार हे विषय आले आहेत. राजनैतिक इतिहास-लेखनांत शकावलीचें महत्त्व फार मोठें असतें. तें स्पष्ट करण्यासाठी लिहिलेला एक लेखहि अंतर्भूत करण्यांत आला आहे.

पूर्वकालीन समाजदर्शन घडेल व वाचकांस ऐतिहासिक परंपरा समजेल अशा स्वरूपाचे लेख निवडून घेण्याची बरीच काळजी, हें पुस्तक तयार करतांना घेण्यांत आली असली, तरी ग्रंथनामास बाध येईल, असेहि कांही लेख या पुस्तकांत आले आहेत. उदाहरणार्थ, इचलकरंजी संस्थानचें वैशिष्ट्य सांगणारा लेख प्रायः राजनैतिक इतिहास सांगतो; तो या संग्रहांत न घेता तरी चाललें असतें. सेनापति दाभाडे याबद्दलच्या लेखाबद्दल तसेंच म्हणतां येईल. पण हा किरकोळ स्वरूपाचा मतभेद म्हणून सोडून देऊं.

लेख निवडण्याचें काम श्री. शंकररावांनी केलेलें दिसतें; त्यांचें उत्तरदायित्व स्वतः त्यांनी न केल्यामुळे पुस्तकांत कांही दोष राहून गेले आहेत. या चांगल्या पुस्तकाचीं मुद्रितें नीट पाहिलीं गेलीं असतीं, तर बरें झालें असतें. इतिहास-संशोधनांत वाचन-दुरुस्तीस फार

मोठें महत्त्व आहे. वाचनाच्या अनेक चुका या पुस्तकांत, केवळ अनास्थेमुळे राहून गेल्या, हें ठीक नव्हे ! उदा. पृ. ३३ वरील पत्रांत पांचव्या ओळींत 'तुम्हांस वतन विकत घ्यावें' असें आलें; तेथे 'द्यावें' असें पाहिजे. पृष्ठ १३ वर 'फेरमुडी' ऐवजी फरेमुडी असें वाचन पाहिजे. पृ. ७१ वर–'मास्ताभिशक' ऐवजी मास्ताभिशक पाहिजे; किंवा, 'पाट शुद्ध केला वगैरे' या वाचनाऐवजी 'पाट शुद्ध लोक वगैरे' असें पाहिजे. पृ. ७२ वरहि २–३ चुका आढळल्या. संपादकांनी या दुरुस्त्या लेखकाकडून करून घेणें जरूर होतें. शिवाय, पुस्तकांत आधार दिले ते बरेच ठिकाणीं सदोष आहेत; त्यामुळे आधारांचा सूक्ष्म ज्ञानासाठी जो उपयोग व्हावयाचा, तो होत नाही.

श्री. शंकररावांचेहि स्वतःचे असे कांही लेखनदोष आहेत. त्यांच्या लेखनांत अनेकदा पाल्हाळ होतो. मुद्दा स्पष्ट करण्यासाठी विस्तार, विस्तारांतून पाल्हाळ असें झाल्यामुळे आटपशीरपणा राहत नाही. त्या दृष्टीने, या लेखावरुन एकदा सफाईचा हात फिरता, तर चांगलें झालें असतें. कांही वेळां या पाल्हाळांतून स्पष्ट शब्दांत निर्णय देण्याचें कार्य राहून जातें ! उदाहरणार्थ 'चौघुला' हा लेख वाचून पहावा. या वतनदाराचें स्थान समाजांत कोठे होतें व तो निश्चितपणें काय करीत होता हें लेख वाचून कळत नाही !

पुस्तक चांगलें आहे, पण निर्दोष नाही हें ध्यानीं येण्यापुरतें हें दिग्दर्शन केलें आहे. मराठींत अशा स्वरूपाच्या संकलनात्मक पुस्तकाची जरूर होती; ती लेखकाने भागविली याबद्दल त्याचे आभार मानणें आवश्यक आहे.

शां. वि. आवळसकर

* * *

# साहित्यवार्ता

## पुणें पूरग्रस्त संशोधक-साहित्यिक यांच्या हानीसंबंधीचा अहवाल

१२ जुलैच्या महापुरामुळें पुण्यांतील संशोधक, साहित्यिक, कलाकार, पत्रकार इत्यादि सांस्कृतिक क्षेत्रांत काम करणाऱ्या व्यक्तींची जी अपरिमित हानि झाली तिचा तपशील, संबंधित पूरग्रस्त व्यक्तींना पत्रें पाठवून म. सा. परिषदेने गोळा केला. मागील अंकीं जाहीर केल्याप्रमाणे या तपशिलाच्या आधारें प्रस्तुतचा त्रोटक अहवाल सादर करीत आहोंत.

महापुरामुळे हानि पोंचलेल्या व्यक्तींची वर्गवारी अशी —

| संशोधक | | लेखक | | कलाकार | | पत्रकार | | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ७ | + | १८ | + | ५ | + | ९ | = | ३९ |

पूरग्रस्तांचीं जेवढीं नांवें समजलीं त्यांच्याकडे विशिष्ट माहिती भरण्याचे तक्ते पाठवून त्यांच्या स्वाक्षरीनेच हानीचा तपशील गोळा केला. पूरग्रस्तांची यादी वर्गवारीने व वर्णानुक्रमें पुढे दिली आहे.

**संशोधक**—केळकर य. न., चित्राव सिद्धेश्वरशास्त्री, जोगळेकर स. आ., जोशी वेंकटेशशास्त्री, ढेरे रा. चिं., पानसे मु. ग., रानडे ग. ह.

**लेखक**—आठवले ना. ग. (अनिरुद्ध पुनर्वसु), कुलकर्णी न. म. (नामानंद रामदासी), खरात शंकरराव, खेर भा. द., चुनेकर सु. रा., जोशी एम्. वाय्., जोशी श्री. ज., टाकळकर गोपाळ, दिवाकर का. गो., देसाई स. शं., पारखी मा. ना, बनहट्टी श्री. ना., बेडेकर दि. के., बेडेकर सौ. मालतीबाई, भिडे विद्याधरशास्त्री, वाळिंबे रा. शं., विप्रदास व. का., क्षीरसागर शां. कृ.

**कलाकार**—इंगळे केशवबुवा, पोतदार श्री. रा., भिडे शं. प., रेगे द. धों., हवालदार मु. श्री. (पहिले गायक, बाकीचे चित्रकार).

**पत्रकार**—कुबेर ना. वा., कुंभोजकर रा. अ., खामकर द. शं., जोग द. वि., थिटे राजाभाऊ, देवधर वि. ना., देशपांडे शं. ह., पाठकजी क. य., वैद्य गो. मो.

वरील पूरग्रस्त व्यक्तींची हानि अनेक प्रकारची झालेली आहे. तो सारा तपशील या अहवालांत देणें शक्य होणार नाही. तथापि हानि पोंचलेल्या हस्तलिखितांची, दुर्मिळ पोथ्यांची व महत्त्वाच्या वस्तूंची माहिती पुढे तपशीलवार दिली आहे.

श्री. य. न. केळकर यांच्या ऐतिहासिक शब्दकोशाच्या हस्तलिखिताचा कांही भाग छापखान्यांत नष्ट झाला. श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांच्या हानीला तोडच सापडणार नाही. 'प्राचीन भारतीय स्थलकोश', 'प्राचीन भारतीय ग्रंथकोश' आणि 'ऋग्वेदाचा उपसंहार' या तीन प्रकाशित होणाऱ्या ग्रंथांचीं हस्तलिखितें (प्रेस कॉपीज्) महापुरांत गडप झालीं, आणि शास्त्रीबुवांच्या दहाबीस वर्षांच्या श्रमांचें पाणी झालें. श्री. स. आ. जोगळेकर यांनी 'सह्याद्रि'प्रमाणे संकलित केलेल्या 'गोदावरी' ग्रंथाचीं विस्तृत टिपणें पुरांत सापडलीं. त्यांची फाइल चिखलाने भरलेल्या स्थितींत सापडली आहे. जोगळेकरांची इतर अनेक विषयां-

वरचीं टिप्पणें मात्र मुठेनें वाहून नेलीं. श्री. वेंकटेशशास्त्री जोशी यांच्या संग्रहांतील सुमारें सांडेतीनशे पोथ्या तर भिजून गेल्याच, पण 'पाश्चात्यांची संस्कृत विद्येची साधना' आणि 'प्राचीन भारतीयांचें राज्यशास्त्र व आदर्श शासनसंस्था' या त्यांच्या स्वतःच्या दोन ग्रंथांची हस्तलिखितेंहि मुठार्पण झालीं. श्री. रा. चिं. ढेरे यांच्या ग्रंथ-संग्रहाची, संकल्पित ग्रंथांच्या हस्तलिखितांची व टिप्पणांची अशीच वाताहत झाली. 'प्राचीन मराठी गद्याचा इतिहास' या त्यांच्या संकल्पित ग्रंथांचा तीन-चतुर्थांश भाग आणि संप्रदाय, संतचरित्रें इत्यादि विषयां-वरील त्यांची संशोधकीय टिप्पणें यांची पुनः जुळणीमिळणी करणें किती दुर्घट आहे हें संशोधकालाच कळूं शकेल. डॉ. पानसे यांची 'सिद्धशब्दार्णव' या जैन-संस्कृत पर्यायकोशाची भाषाशास्त्रीय चिकित्सक आवृत्ति व 'यादवकालीन महाराष्ट्र' ग्रंथाचा 'उपसंहार' लिहून तयार होता. 'महानुभावी मराठी शब्दकोशा' चीहि ते सिद्धता करीत होते. मुठेने त्यांचे हे परिश्रम धुऊन नेले. प्रा. रानडे यांनी 'संगीत कोशा'चें हस्तलिखित जीव धोक्यांत घालून वांचविलें. पण-या विषयासंबंधीचीं त्यांचीं इतर टिप्पणें पुरांत वाहून गेलीं. श्री. शंकरराव खरात अस्पृश्यता या विषयाचे व्यासंगी ललित लेखक. त्यांचीं अनेक हस्तलिखितें व कथा-कादंबऱ्यांची सामग्री पुराने भिजवून निरुपयोगी केली. श्री. सुरेश चुनेकर 'डॉ. माधवराव पटवर्धनां'वरील प्रबंधाची सिद्धता करीत होते. त्यांच्या प्रबंधाचा कांही भाग व या विषयावरच्या निष्पर्ण-नोंदी यांचा नाश झाला. प्रा. बनहट्टी यांच्या रंगभूमीच्या इतिहासाची व भाषाशास्त्रावरील ग्रंथाची बहुमाल सामग्री नष्ट झाल्याने त्यांच्या कार्यांत मोठाच अडथळा आला आहे. प्रा. बेडेकरांच्या 'हेगेलचें तत्त्वज्ञान' या ग्रंथाचीं तीन प्रकरणें आणि भारतीय तत्त्वज्ञानविषयक कांही हस्त-लिखितें व टिप्पणें यांना जलसमाधि मिळाली. तसेंच त्यांनी केलेल्या अनेक शिल्पांचा नाश झाला. डॉ. वाळिंबे प्राचीन भारतीय कला, नाट्यशास्त्र, ज्ञानेश्वरी या विषयांचे व्यासंगी लेखक. पुराने त्यांच्या या विषयावरच्या अनेक हस्तलिखितांना जलसमाधि दिली. म. सा. परिषदेच्या सभा-गृहांतील साहित्य-संमेलनांच्या अध्यक्षांचीं बहुतेक छायाचित्रें ज्यांनी तयार करून दिलीं त्या भिडे मास्तरांचा संग्रह आणि साधनें दोन्ही नष्ट झालीं.

संशोधक व साहित्यिक यांच्याजवळील ग्रंथसंग्रहांची जी हानि झाली त्याची गणति करणें कठीण आहे. कुणाचीं वाद्यें, कुणाचीं चित्रें, कुणाचीं हस्तलिखितें, कुणाच्या पोथ्या अशी विविध प्रकारची ही लवकर न भरून येणारी हानि आहे. ज्यांची विशेष प्रकारची हानि झाली आहे व ज्यांचें कार्य साधनांभावीं अडून राहणारें आहे, अशा साहित्यिक-संशोधकांच्या बाबतींत म. सा. परिषदेने मुख्य मंत्री श्री. यशवन्तराव चव्हाण यांच्याकडे १ सप्टेंबरला सविस्तर निवेदन पाठवून साहाय्याची विनंती केली आहे. महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति-मंडळाचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी व कॉंग्रेस फॉर कल्चरल फ्रीडम या संस्थेचे अधिकारी श्री. व्ही. बी. कर्णिक यांनीहि परिषदेने गोळा केलेल्या माहितीचा उपयोग केला आहे. परिषदेचे उपाध्यक्ष, पुणें विद्यापीठाचे कुलगुरु म. म. प्रा. पोतदार यांनी स्वतंत्रपणें मुख्य मंत्र्यांना आपली योजना सादर केली आहे. या बाबतींत परिषदेने एक साहाय्यनिधीहि उभारला आहे. मराठवाडा कविसंमेलन (नांदेड) या संस्थेकडून ५० रु. ची देणगी या निधीला प्रथम आली ही गोष्ट नमूद करावीशी वाटते. साहित्यप्रेमी इतर धनिकांनीहि या निधीला हातभार लावावा अशी विनंती आहे. वेगवेगळ्या सहायक निधींकडून या पूरग्रस्तांना अल्प का होईना पण प्रत्यक्ष मदत मिळावी व ती शक्य तेवढ्या तातडीने मिळावी यासाठी परिषदेचे पदाधिकारी प्रयत्न करीत आहेत.

## मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष म. म. प्रा. द. वा. पोतदार यांचें निवेदन

१९३० साली मडगांव येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनांत शुद्धलेखनाचा प्रश्न चर्चिला जाऊन मराठी शुद्धलेखनाची एक नवीन नियमावलि महाराष्ट्र साहित्य परिषदेने प्रसिद्ध केली; आणि ती सर्वांनी स्वीकारावी असे प्रयत्न चालू केले. या नियमावलीला हळूहळू अधिकाधिक मान्यता मिळत गेली. या नियमांचा स्वीकार करणारें नागपूर विद्यापीठ हें पहिलें विद्यापीठ होय (सन १९३२). शुद्धलेखनाच्या प्रश्नासंबंधाने अधूनमधून विद्वानांची चर्चा चालूच असे. १९५२ साली अमळनेर संमेलनांत हा प्रश्न पुन्हा आला. तेथील चर्चेचा विचार करून या नियमावलीची सुधारलेली आवृत्ति महाराष्ट्र साहित्य परिषदेने १९५९ साली तयार केली. शिक्षणखात्याने व एस्. एस्. सी. एक्झॅमिनेशन बोर्डाने या नियमावलीला मान्यता दिली.

अमळनेर संमेलनानंतर विदर्भ साहित्य संघाने १९५३ साली विद्वानांची समिति नेमून १९५८ साली आपले नियम प्रसिद्ध केले. मग या नियमांना नागपूर विद्यापीठाने मान्यता दिली.

इ. स. १९६० साली महाराष्ट्र राज्य अस्तित्वांत आलें, आणि मराठी भाषा बोलणारा बहुतेक सर्व सलग प्रदेश या राज्यांत आला. अगदी प्रारंभी १९०६ पासून महाराष्ट्र साहित्य-परिषद् ही सर्व मराठी भाषिकांची प्रातिनिधिक संस्था होती. मुंबई मराठी साहित्य-संघ हा परिषदेला संलग्न होता. पुढे विदर्भ साहित्य संघ व मराठवाडा साहित्य परिषद् या संस्थांची कार्ये त्या त्या विभागांत चालू होऊन वाढीस लागलीं. यामुळे सर्व मराठी भाषकांची एखादी नवी प्रातिनिधिक घटना तयार करण्याचा प्रश्न मराठी साहित्य संमेलनांत अनेक वेळां चर्चेला आला. कारवार संमेलनापासून तों मिरज संमेलनापर्यंत त्याचे अनेक पर्याय चर्चिले गेले; आणि या संस्थांच्या प्रतिनिधींनी सर्वसंमत केलेला एक आराखडा मिरज संमेलनांत जाहीर झाला. त्यानंतर या आराखड्याला महाराष्ट्र साहित्य परिषद्, विदर्भ साहित्य-संघ, मराठवाडा साहित्य परिषद् आणि मुंबई मराठी साहित्य-संघ या चारी संस्थांची एकमताने मान्यता मिळाली, आणि तदनुसार वरील संस्थांच्या प्रत्येकी तीनतीन प्रतिनिधींचे मिळून बारा जणांचें "मराठी साहित्य महामंडळ" दिनांक १२ फेब्रुवारी १९६१ पासून स्थापित झालें.

या महामंडळाने शुद्धलेखन-नियमांविषयी उत्पन्न झालेल्या कांही मतभेदांचा विचार करून एक सर्वमान्य नियमावलि तयार करण्याचा प्रश्न हातीं घेतला आणि मुंबईच्या दि. ४ जून १९६१ रोजींच्या बैठकींत या विचाराला प्रारंभ केला. औरंगाबाद येथे महामंडळाच्या तिसऱ्या बैठकींत (दि. २ सप्टेंबर १९६१) एक शुद्धलेखन-नियमावलि सर्वसंमत केली, तरीहि आणखी कांही तज्ज्ञांचा विचार घेऊन नियमावलीची निश्चिति मुंबईत दि. २ ऑक्टोबर १९६१ च्या सभेंत करावी असें ठरविलें.

दरम्यान महाराष्ट्र राज्य भाषा-सल्लागार मंडळ या शासकीय मंडळाकडेहि हा प्रश्न शासकाने सोपविला होता, आणि त्याने दि. ५ जून १९६१ च्या बैठकींत एक नियमावलि मान्य केली होती. तथापि दि. ३ जुलै १९६१ रोजीं महामंडळाचे अध्यक्ष म. म. प्रा. पोतदार यांनी मुख्य मंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांची या प्रकरणीं भेट घेतली. पुढे दि. १ सप्टेंबर १९६१ रोजीं शासनाने म. म. प्रा. पोतदार यांना असें कळविलें की, आपल्या महामंडळाचा निर्णय चार महिन्यांच्या आंत शासनाकडे कळवावा. त्याप्रमाणे मुंबईला दि. २ ऑक्टोबर १९६१ रोजीं केलेला निर्णय आता शासनाकडे कळविण्यांत येईल.

मराठी शुद्धलेखनाचा जो व्यवहार आज आपणांस सर्वत्र दिसत आहे तो लक्षांत घेतां पूर्वीच्या नियमांत बदल करणें आवश्यक झालें आहे. हें लक्षांत घेऊन शुद्धलेखनांतील सांप्रतचें अराजक नियमित करावें आणि शासनालाहि सुकर व्हावें अशा सर्व दृष्टीने या प्रश्नाचा विचार महामंडळाने केला आणि प्रस्तुतची शुद्धलेखन-नियमावलि स्वीकृत करून तिचा अंगीकार सर्वांनी करावा म्हणून ती प्रसिद्ध केली आहे.

## मराठी साहित्य महामंडळ शुद्धलेखन–नियमावलि

### अनुस्वार

१. स्पष्टोच्चारित अनुनासिकाबद्दल शीर्षबिंदु द्यावा.
उदाहरणार्थ—तंटा, चिंच, आंबा, संस्कृत.
अनुनासिकाबद्दल विकल्पाने परसवर्ण लिहिण्यास हरकत नाही.

२. य्, र्, ल्, व्, श्, ष्, स्, ह् यांच्यापूर्वी येणाऱ्या अनुस्वारांबद्दल संस्कृता-प्रमाणे केवळ शीर्षबिंदु द्यावा. उदाहरणार्थ—सिंह, संयम, मांस.

३. नामांच्या व सर्वनामांच्या अनेकवचनी सामान्यरूपांवर विभक्तिप्रत्यय व शब्दयोगी अव्यय लावतांना अनुस्वार द्यावा. उदाहरणार्थ—लोकांस, मुलांनी, तुम्हांस, लोकां-समोर, घरांपुढे.

४. वरील नियमांव्यतिरिक्त कोणत्याहि कारणांसाठी, व्युत्पत्तीने सिद्ध होणारे वा न होणारे अनुस्वार देऊं नयेत.

### ऱ्हस्वदीर्घ

५. तत्सम ऱ्हस्व इकारान्त आणि उकारान्त शब्द प्रथमेंत दीर्घान्त लिहावे. उदाहरणार्थ—कवी, गती, मती, गुरू. इतर शब्दांच्या अंतीं येणारा इकार व उकार दीर्घ लिहावा. उदाहरणार्थ—पाटी, जादू, पैलू, विनंती, ही ( शब्दयोगी अव्यय). अपवाद—आणि, नि.

स्पष्टीकरण—परंतु, तथापि, यथामति इत्यादि तत्सम अव्ययें ऱ्हस्वान्तच लिहावीं. तसेंच बुद्धिवैभव, कविराज, गतिमान, गुरुवर्य इत्यादि सामासिक शब्दांतहि इकार-उकार ऱ्हस्व लिहावे.

६. दीर्घ ईकारान्त व ऊकारान्त शब्दांचे उपान्त्य इकार-उकार ऱ्हस्व लिहावे. उदाहरणार्थ—गरिबी, माहिती, हुतुतू, सुरू. अपवाद—नीती, भीती, रीती, कीर्ती इत्यादि संस्कृत तत्सम शब्द.

७. अकारान्त शब्दांचे उपान्त्य इकार-उकार दीर्घ लिहावे. उदाहरणार्थ—गरीब, वकील, वीट, सून, वसूल. अपवाद—ऱ्हस्वोपान्त्य अकारान्त तत्सम शब्द. उदाहरणार्थ—गुण, विष, मधुर, प्रचुर.

### सामान्यरूप

८. उपान्त्य दीर्घ ई–ऊ असलेल्या शब्दांचा उपान्त्य इकार-उकार उभयवचनी सामान्य-रूपाच्या वेळीं ऱ्हस्व लिहावा. उदाहरणार्थ—गरिबास, वकिलांनी, सुनेला, वसुलीची,

नागपुरास, जिवाला ( प्राण, मन या अर्थी ). अपवाद—दीर्घोपान्त्य तत्सम शब्द. उदाहरणार्थ—शरीरास, सूत्रांत, गीतेंत, जीवास ( प्राणी या अर्थी ).

किरकोळ

९. 'पूर' हा ग्रामवाचक शब्द कोणत्याहि ग्रामनामाशीं लावतांना दीर्घोपान्त्य लिहावा. उदाहरणार्थ—नागपूर, संबळपूर, तारापूर.

१०. कोणता, एखादा हीं रूपें लिहावीं. कोणचा, एकादा हीं रूपें लिहूं नये.

११. हळूहळू, मुळूमुळू, खुट्टखुट्ट, या शब्दांतील दुसरा व चौथा स्वर दीर्घ लिहावा.

१२. एकारान्त नामाचें सामान्यरूप याकारान्त करावें. उदाहरणार्थ—करण्यासाठी, फडक्यांना ( म्हणजे फडके यांना ), पाहण्याला. करणेसाठी, फडकेंना, पाहणेला यासारखीं एकारान्त सामान्यरूपें करूं नयेत.

१३. बोलण्याची भाषा लेखनांत पात्राच्या किंवा वक्त्याच्या तोंडीं घालावी लागते. त्या वेळीं तिचें स्वरूप बोलण्यांतील उच्चाराप्रमाणे असावें. अन्य प्रसंगीं तसें लिहूं नये.

१४. मराठींत रूढ झालेले पुढील तत्सम शब्द अकारान्त लिहावे.
उदाहरणार्थ—क्वचित, कदाचित, अर्थात, अकस्मात, विद्वान इत्यादि.

## टीपा व पत्रें

### जळगांव येथील 'साहित्य-साधना'

मुंबई, पुणें, नागपूर व औरंगाबाद या प्रमुख शहरांतून साहित्य-संस्थांचीं कार्यालयें आहेत आणि साहित्याचा व्यासंग करणारीं माणसेंहि या ना त्या निमित्ताने एकत्र येऊन आपापल्या अनुभवांची व विचारांची देवाण-घेवाण करीत आहेत. या शहरांतून मोटमोठीं ग्रंथालयें आणि आकाशवाणी-केंद्रें आहेत व त्यांचा लाभहि येथील साहित्यिकांना घेतां येत आहे. ही अनुकूल परिस्थिति महाराष्ट्रांतील लहान शहरांतून नाही व त्यामुळे साहित्याची आवड व जिज्ञासा असलेल्या व्यक्तींना आपल्या व्यासंगासाठी उपकारक ठरेल असें संस्थात्मक स्वरूपाचें साधन अशा ठिकाणीं सहजासहजीं लाभत नाही. व्यक्तिशः साहित्याचा अभ्यास करणारीं माणसें आणि स्वतः साहित्याची निर्मिति करणाऱ्या व्यक्तीहि अशा लहान शहरांतून असतातच; पण अशा ठिकाणीं ज्या साहित्य-संस्था आहेत त्यांचें कार्य सीमित स्वरूपाचें राहतें. वार्षिक संमेलन आणि प्रासंगिक व्याख्यानें एवढें कार्य पार पाडण्यासाठी स्थानिक साहित्यिकांना केवढी तरी शक्ति खर्ची घालावी लागते.

साहित्यासंबंधी अशी परिस्थिति असणें हें साहित्याच्या निकोप अभिवृद्धीच्या दृष्टीने अनिष्ट आहे. मराठी बोलणाऱ्या सर्व थरांच्या आणि प्रदेशांच्या लोकांमध्यें साहित्याची आवड बळावत गेली व त्यांची अभिरुचि वाढत गेली, तरच साहित्याच्या निर्मितीमध्येहि सतत नवा जोम आणि विविधता येत राहील. तसें होण्यासाठी जिल्ह्यांच्या मुख्य शहरांतूनच नव्हे, तर तालुक्यांच्या गांवीं व इतर मोठ्या गांवांतूनहि, साहित्याचा व्यासंग करणाऱ्या व्यक्तींकडून सामूहिक प्रयत्न होणें आवश्यक आहे. समाजाच्या धारणेसाठी माणसांच्या भौतिक गरजा

पुरविणें जरूर असतें तितकेंच त्यांच्या मनाच्या गरजाहि पुऱ्या करणें आवश्यक असतें साहित्याच्या आस्वादामुळे केवळ कांही व्यक्तींची हौस पुरविली जाते असें नसून, समाजाच्या मनाला साहित्यामुळे एक आकार आणि डौल लाभतो. या दृष्टीने साहित्य ही एक मोठी शक्ति मानावयास हवी; परंतु त्याला खरोखरच तसें स्वरूप प्राप्त होण्यास साहित्याची आवड असणारीं व व्यासंग करणारीं माणसें लहानमोठ्या सर्व ठिकाणीं कार्यमग्न असलीं पाहिजेत.

या दृष्टीने जळगांव येथे नुकताच स्थापन झालेली 'साहित्य-साधना' ही संस्था उल्लेखनीय ठरेल. या संस्थेच्या प्राथमिक सभेला पुष्कळ विद्यार्थी आणि प्राध्यापक आस्थेने हजर होते. कांही थोड्या व्यक्तींनी एकमेकांना आपापलें साहित्य वाचून दाखविण्यापुरतेंच या संस्थेचें कार्य मर्यादित राहूं नये असा इशारा देऊन प्रा. अदवंत यांनी सांगितलें की, या संस्थेच्या सभासदांनी साहित्याचा सर्वांगीण अभ्यास हें ध्येय ठेवून कार्य केल्यास साहित्यसाधना हें संस्थेचें नांव सार्थ ठरेल. साधना करण्यास लागणारी चिकाटी व निष्ठा असलेले साहित्यप्रेमी तरुण जर जळगांवप्रमाणेच इतर लहानमोठ्या शहरांतून पुढे आले, तर मराठी साहित्याच्या, आणि अनुषंगाने आपल्या एकंदर कलात्मक आणि सांस्कृतिक जीवनाच्या दृष्टीने आपल्याला फार झपाट्याने प्रगति करतां येईल.

दि. के. बेडेकर

* * *

## शोक–समाचार

गेल्या तिमाहींत पुढील विद्वान् व्यक्ति निधन पावल्या.

श्री. नरहरशास्त्री जोशी–खरशीकर (२२-६-६१), श्री. शिवरामपंत वाशीकर (२३-६-६१), कै. नारायणराव ब्रामणगावकर (८-७-६१), प्रा. मा. ग. बुद्धिसागर (१६-८-६१) व डॉ. रा. चिं. श्रीखंडे (१-९-६१).

परिषदेला व 'पत्रिके'ला या सर्वांच्या निधनाबद्दल दुःख होत आहे.

# परिषद्वार्ता (चिटणिसांकडून)

**कै. औंधकर पुण्यतिथि**—माजी संमेलनाध्यक्ष व परिषदेचे एक आश्रयदाते कै. भवानराव तथा बाळासाहेब पंतप्रतिनिधि (औंध संस्थानचे अधिपति) यांची पुण्यतिथि १३ एप्रिल रोजीं साजरी करण्यांत आली. या प्रसंगीं डॉ. के. ना. वाटवे यांच्या हस्तें कै. औंधकरांच्या छायाचित्राला पुष्पहार अर्पण करण्यांत येऊन त्यांचें स्मरण करण्यांत आलें. समारंभाला कार्याध्यक्ष प्रा. क्षीरसागर, प्रा. चिं. वि. जोशी, प्रा. दि. के. बेडेकर, श्री. वि. त्र्यं. शेटे, पां. र. अंबिके, श्री. भय्यासाहेब व श्री. आबासाहेब पंतप्रभृति मंडळी उपस्थित होती.

**भेटीगांठी**—विदर्भ साहित्य संघाचे माजी अध्यक्ष दै. 'महाराष्ट्र' चे संपादक श्री. पु. दि. ढवळे लो. टिळक पुण्यतिथिनिमित्त पुण्याला आले होते. त्यांच्या षष्ट्यब्दिपूर्तीनिमित्त परिषदेने दि. २ ऑगस्टला त्यांचें अभीष्टचिंतन केलें. चिटणीस श्री. वि. त्र्यं. शेटे व डॉ. वाटवे या वेळीं उपस्थित होते. वंग साहित्याचे एक प्राध्यापक प्रो. शिवनारायण रे (एस्. आय्. इ. एस्. कॉलेज, शीव मुंबई येथील इंग्रजीचे प्राध्यापक) यांनी ९ सप्टेंबरला परिषदेस भेट दिली. या वेळीं प्रा. क्षीरसागर, श्री. तळवलकर, प्रा. बेडेकर, श्री. शेटे, प्रा. मंगरूळकर, प्रा. डांगे, डॉ. घारपुरे, श्री. वि. द. घाटे, डॉ. वाटवे इत्यादि मंडळींबरोबर त्यांची साहित्यविषयक चर्चा झाली. पुणें आकाशवाणीचे उपसंचालक श्री. कृ. द. दीक्षित यांनी खास निमंत्रणावरून परिषदेस दि. १५ सप्टेंबरला भेट दिली. त्यांच्या या भेटप्रसंगीं प्रा. रा. श्री. जोग, प्रा. क्षीरसागर, श्री. तळवलकर, श्री. शेटे, प्रा. बेडेकर, प्रा. मंगरूळकर, डॉ. घारपुरे, प्रा. डांगे, श्री. खरात व कवि. बा. भ. बोरकर उपस्थित होते. उपस्थितांबरोबर श्री. दीक्षित यांनी अनौपचारिकरीत्या आकाशवाणीवरील कार्यक्रमासंबंधी चर्चा केली. श्री. आ. रा. देशपांडे ऊर्फ कवि अनिल (माजी संमेलनाध्यक्ष) यांचा षष्ट्यब्दिपूर्तीनिमित्त परिषदेने १८ सप्टेंबरला अनौपचारिकरीत्या सत्कार केला. या प्रसंगीं म. म. प्रा. पोतदार, श्री. वि. द. घाटे, प्रा. क्षीरसागर, श्री. तळवलकर, प्रा. सरदार, प्रा. बेडेकर, श्री. शेटे, प्रा. मंगरूळकर, प्रा. डांगे, श्री. द. रा. गोमकाळे, सौ. संजीवनी मराठे, सौ. पद्मा गोळे, डॉ. घारपुरे, कवि मनमोहन इत्यादि मंडळी उपस्थित होती. अनिल, सौ. संजीवनी, श्री. वि. द. घाटे व मनमोहन यांचें काव्यगायन झालें.

**प्रा. सौ. कुसुमावती देशपांडे यांचा सत्कार**—ग्वाल्हेर संमेलनाच्या नियोजित अध्यक्ष प्रा. सौ. कुसुमावती देशपांडे यांचा परिषदेतर्फे दि. ३० ला म. म. प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेने प्रकट सत्कार करण्यांत आला. कार्याध्यक्ष प्रा. श्री. के. क्षीरसागर, अध्यक्ष प्रा. रा. श्री. जोग व सौ. शांताबाई किर्लोस्कर यांचीं गुणवर्णनपर भाषणें झालीं. श्री. गोपीनाथ तळवलकर यांनी आभार मानल्यावर समारंभ संपला. या वेळीं देशमुख आणि कंपनी, इंटरनॅशनल बुक-सर्व्हिस, किर्लोस्कर मासिकें इत्यादि संस्थांतर्फे सौ. कुसुमावतींना हार घालण्यांत आले. समारंभापूर्वी सौ. कुसुमावतींच्या हस्तें ज्ञानकोशकार कै. केतकर यांच्या अस्थींना श्रद्धांजलि वाहण्यांत आली. (१२ जुलैच्या महापुरामुळे कै. केतकरांच्या समाधीला धोका उत्पन्न झाल्यामुळे १ ऑगस्टला प्रा. दि. के. बेडेकर यांनी महानगरपालिकेची परवानगी घेऊन समाधीचें उत्खनन करून अस्थि परिषदेंत आणून ठेवल्या होत्या. डॉ. ग. वि. पुरोहित

यांनी त्या अस्थि स्वच्छ करविल्या. त्यानंतर आता एका नव्या सुंदर लाकडी पेटींत त्या ठेवल्या असून, महानगरपालिकेकडून जागा मिळाल्यावर तेथे त्या ठेवून कै. केतकरांचें स्मारक करण्यांत यावयाचें आहे. )

**परिभाषा-मंडळ**—डायरेक्टर ऑफ ॲनिमल हस्बंड्री यांच्या विनंतीपत्रानुसार परिषदेच्या परिभाषा-मंडळाने दि. १६, २०, २७ व २८ सप्टेंबर रोजीं सभा भरवून 'प्राणि-संगोपन राज्यशाखेंतील अधिपदांचीं अभिधानें' सिद्ध करून खात्याकडे पाठविलीं. डॉ. म. वि. आपटे, डॉ. त्र्यं. र. खळदकर व प्रा. ज. नी. कर्वे यांनी या कामीं सर्वतोपरि साहाय्य केलें. पहिल्या सभेला प्रा. स. वि. आपटे व असिस्टंट डायरेक्टर डॉ. लेले उपस्थित होते.

**शाखासभा वृत्तान्त**—गेल्या तिमाहींत परिषदेचे एक चिटणीस प्रा. म. ना. अदवंत यांनी जळगांव जिल्ह्यांत प्रचार करून सुमारें ४० नवीन सभासद केले. 'जळगांव जिल्हा शाखासभा' स्थापन करण्याच्या दृष्टीने त्यांनी इतर कार्यकर्त्यांच्या सहकार्याने घटनेचा एक खर्डा तयार केला असून, तो कार्यकारी मंडळाकडे मान्यतेसाठीं पाठविला आहे.

सोलापूर शाखासभेची त्रैवार्षिक निवडणूक दि. २१ सप्टेंबरला होऊन पुढीलप्रमाणे पदाधिकारी निवडून आले. डॉ. कृ. शे. मार्डीकर ( अध्यक्ष ), डॉ. दु. का. संत व प्रा. मा. चिं. टेंभेकर ( उपाध्यक्ष ), श्री. शं. गो. पटवर्धन ( कार्याध्यक्ष ), श्री. प. बा. आळंदकर ( कोषाध्यक्ष ), श्री. शा. ब. कुलकर्णी व श्री. दि. गो. सुलाखे ( कार्यवाह ).

सातारा शाखासभेच्या १९६०–६१ च्या वार्षिक साधारण सभेंत ६१–६२ सालांसाठी पुढील पदाधिकाऱ्यांची निवड झाली. श्री. रा. स. ढवळे ( कार्याध्यक्ष ), श्री. अ. श्री. भड-कमकर व श्री. ग. वा. करंदीकर ( कार्यवाह ). चालू वर्षी शाखेतर्फे पुढील कार्यक्रम झाले. ३० मे रोजीं प्रा. मालवा केळकरांचें व्याख्यान. १६ ऑगस्टला श्री. चिंतामणि ठकार यांचें व्याख्यान. ४ सप्टेंबरला तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांची कार्यकर्त्यांसमवेत चर्चा.

**पोटसमित्यांच्या सभा**—२७ ऑगस्टला परीक्षासमितीची सभा होऊन चालू वर्षासाठी परीक्षकांची नियुक्ति करण्यांत आली व परीक्षांचा कार्यक्रम ठरविण्यांत आला. योजना-समिति व ग्रंथालय-समिति यांच्या सभा भरून विविध योजनांची चर्चा झाली.

**इतर**—डॉ. वा. दा. गोखले संपादन करीत असलेल्या अत्रचितसुत काशीकृत 'द्रौपदी-स्वयंवरा' ची आवृत्ति सांप्रत छापत आहे. वाङ्मयेतिहास-योजनेंतील चौथ्या खंडाचें लेखन जवळ-जवळ पूर्ण होत आलें असून, डिसेंबरअखेर तें पूर्ण होईल अशी आशा वाटते.

* * *

५३. प्रा. गो. ल. दाके, अमळनेर.
५४. श्री. वा. श्री. देशपांडे, अमळनेर.
५५. श्री. अ. दि. लिमये, अमळनेर.
५६. श्री. द. कृ. निमकर, अमळनेर.
५७. श्री. य. पु. संत, अमळनेर.
५८. प्रा. मो. द. वद्ये, अमळनेर.
५९. प्रा. भा. ज. कविमंडन, अमळनेर.
६०. प्रा. ग. दा. कुडे, अमळनेर.
६१. प्रा. श. पं. पेंडसे, अमळनेर.
६२. श्री. मो. बा. प्रभु, अमळनेर.
६३. प्रा. उषा वा. पुरोहित, अमळनेर.
६४. प्रा. निर्मलकुमार फडकुले, सोलापूर.
६५. श्री. व. प्र. गीत, पुणें २.
६६. श्री. व. स. गोखले, पुणें २.
६७. श्री. न. ल. इनामदार, पुणें २.
६८. श्री. मंजुळाबाई जयकर, मुंबई ९.
६९. श्री. रा. कृ. जाधव, सातारा.
७०. श्री. कृ. के. देशपांडे, लोहारा (उस्मानाबाद).
७१. श्री. एल्. आर्. चौगुले, मच्छ (बेळगांव)
७२. श्री. श्री. बी. कंधारकर, परभणी.
७३. श्री. र. ज. कोलते, जळगांव.
७४. सौ. कमलाबाई वि. फडके, पुणें ४.
७५. सौ. रेखा व. झांबरे, पुणें २.
७६. श्री. वा. कृ. परांजपे, पुणें २.
७७. सौ. शांताबाई किर्लोस्कर, पुणें ४.
७८. श्री. वि. द. गंधे, जळगांव.
७९. श्री. दे. शं. सारस्वत. जळगांव.
८०. श्री. ह. दा. राजकोटिया, जळगांव.
८१. श्री. बा. वि. दीक्षित, जळगांव.
८२. श्री. म. चु. बाहेती, जळगांव.
८३. श्री. धों. वे. जोगी, जळगांव.
८४. कु. रजनी भा. प्रधान, जळगांव.
८५. कु. सिंधु तळेले, जळगांव.
८६. श्री. भा. गो. चौधरी, जळगांव.
८७. श्री. व. म. केळकर, जळगांव.
८८. श्री. ना. र. मारुलकर, पुणें २.
८९. श्री. य. ग. जोशी, नवी दिल्ली.
९०. श्री. ग. शं. मुळे, पुणें २.
९१. श्री. अ. श्री. भडकमकर, सातारा.
९२. श्री. प्र. शं. महाबळेश्वरकर, सातारा.

---

# महाराष्ट्र–साहित्य–परिषद्–प्रकाशनें

१ मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास (मानभाव अखेर)
लें. कै. वा. अ. भिडे (प्रती शिल्लक नाहीत)

| | | |
|---|---|---|
| २ | म. सा. परिषद्-इतिहास | रु. न.पै. |
| | लें. म. मं. प्रा. द. वा. पोतदार | ३=०० |
| ३ | संत-वाङ्मयाची सामाजिक फलश्रुति | २=०० |
| | लें. प्रा. गं. बा. सरदार | |
| ४ | वाङ्मय-समालोचन (१९४७) | २=०० |
| ५ | वाङ्मयीन वाद (परिषद्-पुरस्कृत) | ३=०० |
| ६ | निबंध-विकास (प्राज्ञ परीक्षेस लावलेलें) | २=५० |
| ७ | साहित्य-सुगंध (प्रवेश ,, ,, ) | २=५० |
| ८ | सारस्वत-प्रवेश (प्रथमा ,, ,, ) | २=०० |
| ९ | शुद्धलेखन-नियम (१९६१ ची आवृत्ति) | ०=१५ |
| १० | गुजराती वाङ्मय समालोचन (१९५९) | १=०० |
| ११ | हिंदी वाङ्मय समालोचन ( ,, ) | १=०० |

(क्र. ५ या पुस्तकाची मागणी प्रसाद-प्रकाशन, सदाशिव, पुणें २ यांच्याकडे करावी.)

इतर चौकशी :– चिटणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

कार्यालयाच्या वेळा

सकाळीं ...... ८॥ ते १०॥

दुपारीं ...... ४ ते ८

दर मंगळवारीं सुटी

मुद्रक :— दा. त्र्यं. जोशी, व्यवस्थापक, चित्रशाळा प्रेस, ५६२ सदाशिव पेट, पुणें २.
प्रकाशक :— चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.